# राखेंतले निखारे

लेखक
अनंत काणेकर

प्रकाशक
काँटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणें.

—'राखेंतले निखारे' या संग्रहांत सहामात संकीर्ण लेख, आणि प्रस्तावना, परीक्षणें इत्यादि सातआठ टीकालेख आहेत. ज्या प्रस्तावनांत किंवा परीक्षणांत कांहींना कांहींतरी वाङ्मयीन महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा आहे, अशांनाच इथें स्थान दिलें आहे. ललित वाङ्मयाची कसोटी, स्वप्नरंजन, वास्तवता इत्यादि प्रश्नांच्या चर्चेला 'ज्वाले–' चें परीक्षण निमित्त झालेलें असलें, तरी श्री. माधव मनोहरांच्या पहिल्यावहिल्या कृतीबाबत माझ्या हातून थोडासा फाजील कठोरपणा दाखविला गेला असें मला वाटतें. असें असूनही हा वाद चालू असतां आणि त्यानंतर त्यांनी जो खेळाडूपणा आणि स्नेहभाव दाखविला त्याबद्दल त्यांचे आभार मानावेसे वाटतात.

इतर टीकालेखांतही कांहीं व्यक्तींचा उल्लेख झाला आहे. कुणाही व्यक्तीला दुखविण्याचा किंवा सुखविण्याचा माझा उद्देश नाहीं. तेव्हां व्यक्तीपेक्षां वादविषयाकडेच लक्ष दिलें जावें हीच प्रार्थना.

—अनंत काणेकर

१८ ऑगस्ट १९४१

# अनुक्रमणिका

# ‘ कोळ्याचें गाणें ’ : : १

‘ कोळ्याचें गाणें ’ या माझ्या कवितेसंबंधीं बोलण्यापूर्वी एक विलक्षण योगायोग तुम्हांला सांगितल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं. आज, म्हणजे ता. १७ जानेवारी १९४० रोजीं तुमच्यासाठीं या कवितेवर बोलायचं, म्हणून माझ्या कवितेचं पुस्तक काढून त्यांतली ही कविता मी सहज चाळीत होतों, तों कवितेखालच्या तारखेकडे माझं लक्ष गेलं. ती तारीख १७ जानेवारी १९२८ होती ! म्हणजे ज्या दिवशीं मीं ही कविता लिहिली तेव्हांपासून बरोबर १२ वर्षांनीं किंवा एक तपानं या कवितेवर मी तुमच्यासमोर बोलत आहें ! थोडा मजेदारच योगायोग आहे—नाहीं ? ती तारीख पाहून दुसरी एक गोष्ट आठवली. ही कविता लिहिण्यापूर्वी एक वर्षभर मी कविता लिहिलीच नव्हती. त्यापूर्वीची कविता ता. २ जानेवारी १९२७ रोजीं लिहिलेली आहे. आतां आपणाला बहुतेक भावगीत किंवा lyric लिहितां येणार नाहीं, अशा मनःस्थितीत मी होतों. इतक्यांत ही कविता लिहून झाली. आपली काव्यशक्ति अजूनही जिवंत आहे, या विचारानें माझ्या मनाला थोडा उल्हास वाटला !

‘ चांदरातींत’ल्या माझ्या बहुतेक कविता आत्मनिष्ठ किंवा कवि स्वतः-च्या भावना व्यक्त करितो आहे अशा प्रकारच्या आहेत. ही कविता तशी नाहीं. या कवितेंत एका कोळ्याच्या भावना व्यक्त केलेल्या आहेत. म्हणजे हें एक नाट्यगीत आहे. हाही या कवितेचा एक विशेष होय. वर जें मीं

म्हटलें, कीं जवळजवळ एका वर्षानंतर मी नवी कविता लिहूं शकलों तेव्हां मला बरं वाटलं, त्या म्हणण्यांत थोडासा आणखी अर्थ आहे. लघु-कथा किंवा निबंधासारखं गद्य लिखाण विषयाचा पूर्ण विचार करून, वाटेल तेव्हां बसून लिहितां येतं. अर्थात्, तेव्हांही प्रसन्न किंवा अनुकूल मनोवृत्तीची आवश्यकता असतेच. पण भावगीतांचं तसं नाहीं. अगदीं लिहिल्याशिवाय रहावत नाहीं अशी बेचैन करून टाकणारी स्फूर्ति आल्याशिवाय जातिवंत भावगीत लिहितां येत नाहीं, असं मला वाटतं. फार काय, कविता लिहून होईपर्यंत कवितेचं नांव काय देतां येईल याचीही कवीला कल्पना नसते. कांहीं कवि वाटेल तेव्हां, वाटेल तशी विषयाची निवड करून कविता लिहूं शकत असतील. पण तें भावगीत होईल असें मला वाटत नाहीं.

हा स्फूर्तीचा प्रश्न निघाला तेव्हां 'कोळ्याचें गाणें' लिहिण्याची स्फूर्ति कुठें व केव्हां झाली, हें समजून घेणें तुम्हांला खात्रीनें मनोरंजक वाटेल. एखादी कविता कशी व केव्हां लिहिली जाते, यासंबंधीं सामान्य माणसाच्या मोठ्या मजेदार कल्पना असतात. फुलझाडासंबंधीं कविता असेल तर फुलझाडासमोर उभा राहून तें फुलझाड पाहून झालेल्या आनन्दाच्या भरांत कवीनें कविता खरडून टाकली असेल, असें बहुतेक लोकाना वाटतें. विरहासंबंधीं कविता असेल, तर विरहानें बिछान्यावर तडफडत असतांच कवीनें विरहगीत लिहिलें असलें पाहिजे अशी अनेक रसिकांची खात्री असते ! पण वस्तुस्थिति अगदीं याच्या उलट असते. सुखाच्या किंवा दुःखाच्या भावनेनें मनुष्य भारावलेला असतो, तेव्हां तो लिहिण्याचें काम करूंच शकणार नाहीं. त्या भावनेंतून मोकळा झाल्यानंतर कित्येक दिवसांनीं शांत, समतोल मनःस्थितींत असतांनाच तो त्या पूर्वी अनुभवलेल्या भावनांना व्यवस्थित शब्दरूप देऊं शकेल. पतिनिधनाच्या भयंकर दुःखाग्नीत होरपळत असतां, एखादी कवयित्री कागद पेन्सिल घेऊन शार्दूलविक्रीडित किंवा मन्दाक्रान्ता वृत्ताच्या गणमात्रा मोजीत हृदयभेदक शोकगीत लिहूं शकेल असें मला वाटत नाहीं ! म्हणूनच वर्डस्वर्थ म्हणतो कीं, ' Poetry is emotion recollected in tranquility. '.

प्रसन्न, प्रशांत मनःस्थितींत पुन्हां आठवलेली किंवा स्मृतिमंजूषेंतून शांत-पणें बाहेर काढलेली भावना म्हणजेच कविता. ज्या प्रसन्न मनःस्थितींत ही जुनी भावना वर उफाळते, तोच स्फूर्तीचा क्षण. त्या क्षणीं कुठली भावना वर उफाळेल याचा नेम नसतो. अमुकच वेळीं अमुकच भावना कां व कशी वर आली, हें कुणाला सांगतां येईल असें मला वाटत नाहीं. ती अमक्या वेळीं आली आणि तिला असें शब्दरूप दिलें, एवढेंच कवि सांगूं शकेल.

'कोळ्याचें गाणें' या कवितेसंबन्धीं असा प्रश्न मला अनेकांनीं अनेक वेळां विचारला आहे. 'कां—हो, समोर समुद्र फेंसाळतो आहे, सोनेरी सूर्यप्रकाश लाटांवर चमकतो आहे, आकाशांत लाल, गुलाबी, मोतिया रंगाची लयलूट चालली आहे; अशा वेळीं एखाद्या तरुण कोळी--जोड-प्याला पाण्यांत होडी ढकलतांना पाहून तुम्ही समुद्रकांठावर बसूनच ही कविता लिहिली असेल, नाहीं ?' त्यांचा हा प्रश्न ऐकला कीं मला हसूं येतें. ही कविता मीं सकाळच्या वेळीं लिहिली आहे ही गोष्ट खरी; पण ती कुठें ? शिष्टाचार सांभाळून बोलायचें म्हणजे चारचौघांत ज्याचं एकदम नांव घेऊं नये अशा घरामागें असलेल्या घराच्या एका विशिष्ट भागांत सकाळच्या वेळीं ही कविता लिहिण्याची मला स्फूर्ति आली !—आणि या कवितेंतले एक दोन चरण माझ्या डोक्यांत घोळूं लागले. आणि ते चरण तरी कुठले ? 'हिरव्या साडीला लालभडक धारी; गोऱ्या भाळीं तुझ्या लाल चिरी !' हे चरण डोक्यात घोळत असतां ही कविता कोळ्यासंबंधीं किंवा समुद्रासंबंधीं होईल याची मला कल्पनाही नव्हती. गोरें कपाळ आणि लाल कुंकू, हिरवी साडी आणि लाल धारी, असं एक अस्पष्ट, रंगीबेरंगी कांहींतरी दृश्य माझ्या मनःचक्षूंपुढें दिसत होतं इतकंच. पुढें मग त्या दिवसांत केव्हांतरी बाकीचे चरण लिहिले. आणि ते लिहीत असतां मग समुद्र, सकाळची वेळ, कोळी, कोळीण इत्यादि गोष्टी गोळा होऊन कवितेनें एक विशिष्ट आकार आणि स्वरूप धारण केलं. मात्र एकदां हें कोळ्याचं गाणं करायचं असं ठरल्यावर आणि त्याची पार्श्वभूमि नक्की झाल्याबरोबर त्याची रचना, कल्पना आणि प्रतिमायोजना ( employ-

ment of images ) या गोष्टी आपोआपच स्पष्ट झाल्या.

या कवितेचा अन्वयार्थ मी तुम्हांला सांगायला पाहिजे असें नाहीं. तो अगदीं सरळ आणि सोपा आहे. पण ज्या कांहीं विशिष्ट कल्पना मनांत धरून या गाण्याची मी रचना केली आहे, त्या सांगून टाकणें आवश्यक आहे. कोळी आणि कोळिणीच्या प्रणयाला समुद्र आणि होडी-च्या प्रणयाची पार्श्वभूमि दिली आहे. समुद्र होडीशीं जी लगट करतो आहे, तिचं रसभरित वर्णन करून आपण तसंच करूं या, असं जणुं काय तो कोळी आपल्या वल्लभेला सुचवीत आहे. धीर सुटलेला समुद्र होडीला धरूं पाहातो आहे, तिला तो वर खालीं ओढतो आहे, तो खुळा झाला आहे, होडीशीं गोष्टी करण्याकरितां तो फेसावर डुलत येतो आहे आणि त्याच्या मनाप्रमाणें होडी त्याच्या उरावर भुरुभुरु चालू लागल्या बरोबर तो खुषी झाला आहे, हें वर्णन करतांना तो कोळी स्वतःचंच प्रतिबिंब समुद्रांत पाहात आहे. त्याचप्रमाणें पहिल्या तीन कडव्यांत अंतऱ्याच्या ज्या तीन तीन ओळी आहेत, त्यांचीही विशिष्ट रचना तुमच्या लक्षांत आली असेल. पहिल्या दोन ओळींत आजूबाजूच्या निसर्गाचं वर्णन आहे, आणि तिसऱ्या ओळींत त्या निसर्गासारखंच आपणां दोघांत,— माणसांत कांहींतरी आहे असं साम्य तो कोळी दाखवून देतो आहे. उदाहरणार्थ, हिरव्या पाण्यावर पांढरा फेंस खळबळत आहे, पाण्यांत मासळी तडफडत आहे, त्या मासळीप्रमाणेंच आपलं काळीज तडफडत असल्याचं कोळी सांगतो. आभाळांत तांबडं फुटलं आहे, त्याची लाल चमक पाण्यावर दिसते आहे; तशीच छटा तुझ्या गालावर दिसते आहे असं तो वल्लभेला म्हणतो. चौथ्या, म्हणजे शेवटच्या कडव्यांत मात्र निस-र्गाचं वर्णन नाहीं. पहिल्या दोन ओळींत तिच्या गोऱ्या कपाळाचं आणि लाल धारीच्या हिरव्या साडीचं वर्णन करून तिसऱ्या ओळींत दोघांच्याहि उरांत उठलेल्या गोड शिरशिरीचा तो उल्लेख करतो. पहिलीं तीन कडवीं होईपर्यंत निसर्गातल्या गोष्टींचं वर्णन करण्याइतका धीर त्यानें कसाबसा धरला; चौथ्या कडव्यांत या भानगडी तशाच सोडून तो जणूं काय सर्वस्वीं आपल्या वल्लभेकडे वळला !

पहिल्यांदा मीं ही कविता लिहिली, तेव्हां तिचं ध्रुवपद एक दोन ओळींचें आणि अगदींच रुक्ष होतं. तें म्हणतांना मला मुळींच समाधान वाटत नव्हतं. कांही तरी ठीक नाहीं ही कल्पना मला डांचत होती. संगीताचा श्रीगणेशाही मला येत नाही. राग–तालाची मला मुळींच माहिती नाही. पण सागराच्या भव्य हालचालीचा लव-लेशहि आपल्या या ध्रुवपदांत नाहीं—कांही तरी चुकतं आहे, असं मला सारखं वाटत होतं. शेवटीं दोन दिवसांनी सध्यां असलेलं ध्रुवपद म्हणजे 'आला खुशींत समिंदर, त्याला नाहीं धिर, होडीला देइना ठरूं, ग सजणे, होडीला बघतो धरूं' हें, आणि इतर कडव्यांच्या शेवटच्या समुद्राच्या हालचालीचें वर्णन करणाऱ्या ओळी मीं लिहिल्या. या ओळी लिहिल्या-वर मात्र मला समाधान वाटलं. सागरलहरींवर नाचणाऱ्या होडीची गति या ओळींत आली आहे असं मला वाटतं. सौ. ज्योत्स्ना भोळे यांच्या सुरेल गळयांतून या ओळी बाहेर पडतात, तेव्हां आनंदानें वेडावलेल्या श्रोत्यांना हीच गति प्रतीत होत असावी.

या गीतासंबंधी मला जेवढं सांगतां येण्यासारखं होतं, तेवढं मीं तुम्हांला सांगितलं. आतां त्यावरल्या एक दोन आक्षेपांसंबंधीं मला काय वाटतं तें सांगतों. वास्तववादाचे कांहीं पुरस्कर्ते मला विचारतात, मधें मधें 'समिंदर' 'रक्तावाणी' असे रांगडे शब्द असले तरी या कवितेंतले इतर बहुतेक शब्द शुद्ध आणि प्रौढ आहेत. तुमचा कोळी चांगलाच सुशिक्षित दिसतो! वास्तववादाच्या दृष्टीनें हें म्हणणें सयुक्तिक वाटतें. पण असला शंभर टक्के वास्तववाद कलेच्या किंवा वाङ्मयाच्या प्रांतांत शक्य नाहीं, आणि आवश्यकहि नाही. कलेच्या प्रांतांत ध्वनीनें—सूचनेनं एखादं चित्र उभं करायचं असतं. सांगोपांग तपशीलवार चित्र कॅमेऱ्यासारखं यंत्र उभं करतं. कलेंतला वास्तववाद इतकाच कीं, कलाकृतीचा आस्वाद घेतांना क्षणभर तें वातावरण खरं आहे असं रसिकाला वाटणं. समजा, आपण अत्यंत वास्तववादी असं नाटक करायचं ठरवलं. अगदीं घरासारखं घर रंगभूमीवर उभं केलं, खुर्च्या टेबलं आंत आणून ठेवलीं. हुबेहुब भिंती-सारख्या भिंती उभ्या केल्या. तरीपण चौथी भिंत आपणाला रंगभूमीवर

उभी करून चालणार नाहीं. कारण तसं केलं तर पात्रें आंत काय करताहेत तें प्रेक्षकांना दिसणारच नाही. नाटकांतलं घर कितीहि वास्तववादी असलं तरी त्याला खऱ्या घरासारखी चौथी भिंत असून चालणार नाहीं. एकंदर तीन भिंतींची आणि आंतल्या खुर्च्याटेबलांची मांडणी प्रेक्षकाला आपण खरें घर पहातों आहोंत इतका कांही वेळ भास उत्पन्न करण्याइतकी असली कीं झाला नाटकांतला वास्तववाद. या कोळ्याच्या गाण्यांतही तें कोळ्याचं आहे, एवढा भास उत्पन्न होण्याइतके समिंदर वगैरे शब्द मी मधून मधून पेरले आहेत. कोळ्याच्या भाषेचं यथार्थ दर्शन देणं हा या गाण्याचा मुळीं हेतुच नाहीं. तेव्हां यापेक्षां अधिक वास्तवतेची त्यांत आवश्यकता आहे असं मला वाटत नाहीं. ‘ कोळ्याच्या गाण्या ’ ची ही सत्यकथा तुम्हांला आवडली का ?

—रेडिओवर केलेलें भाषण.

———

# बैलाचा मृत्यु : : २

काश्मीरचं पहिलं दर्शन ' उडी ' गांवांत झालं. सकाळीं सात वाजतां रावळपिंडी सोडल्यापासून आतां संध्याकाळी सात वाजतां ' उडी ' येथें पोहोंचेपर्यंत दऱ्याखोऱ्यांतून, पहाडापठारावरून, शेंकडों पठाणी खेड्यांतून आम्ही धूळ खात आलों होतों. डोकं गरगरत होतं. अंग मोडकळीला आलं होतं. पण एका बाजूला झेलम नदीची काळीकाभिन्न खोल दरी आणि दुसऱ्या बाजूला उत्तुंग पहाड, यांच्या मधल्या चिंचोळ्या जमिनीच्या तुकड्यावर पहाडाच्या पायाशीं बिलगलेल्या ' उडी ' गावांत मोटारमधून खालीं पाय ठेवल्याबरोबर हिमालयावरून सरळ आलेला थंडगार वारा आपल्या सुखस्पर्शानें सर्वांग पुलकित करूं लागला; आणि आमच्या सर्व श्रमांचा परिहार झाला. आम्ही दमलों भागलों होतों हेंही आम्ही विसरलों. आजूबाजूचा अदृष्टपूर्व देखावा आम्ही अधाशासारखे डोळे भरून पाहूं लागलों. काळोखानें भरत चाललेली बाजूची ती भयाण दरी, एखाद्या देवमंदिराप्रमाणें खालून वर कळसाकडे निमुळते होत गेलेल्या, ' देवदारु ' या यथार्थ नांवानें ओळखल्या जाणाऱ्या, सरळ उंचच्या उंच वाढलेल्या हिरव्या काळ्या वृक्षांच्या घनदाट झाडीनें मढवलेला तो प्रचंड पहाड, आणि दूर समोर दिसणारें एक हिमाच्छादित शिखर, हें पाहिल्याबरोबर आपण हिमालयाच्या मांडीवर,—काश्मीरांत आहोंत याची खात्री पटली. सकाळपासूनच्या दीडशें पावणेंदोनशें मैलांच्या

प्रवासांत डोंगर पहाड बरेच दिसले होते; पण शुभ्र हिमवेष्टित शिखर आतां पहिल्यांदाच दिसलें. माणसाला स्वतःच्या क्षुद्रपणाची जाणीव करून देणारा,—माणसाला हतबुद्ध करून टाकणारा—भव्य, भयानक निसर्ग आमच्यासमोर उभा होता. या निसर्गावर मात करण्यांतच माणसाची माणुसकी आहे याचा माणसाला काश्मीरांत एकदम विसर पडतो. आणि तें अगदीं साहाजिक आहे. कारण दैन्य, दारिद्र्य, दुबळेपणा यांत शतकानुशतकें खितपत पडलेल्या काश्मिरी माणसावर निसर्गानें मात केली आहे ! माणसापेक्षां निसर्गाशी अधिक जवळ असलेल्या गुरांढोरांच्या—गाईबैलांच्या प्राणाला इथं माणसाच्या प्राणापेक्षां अधिक मोल आहे. तोच अनुभव मला इथं सांगावयाचा आहे.

उडीहून श्रीनगर फक्त पन्नाससाठ मैलांवरच आहे. आज रात्रीं इथें मुक्काम करून उद्यां सकाळीं आम्ही श्रीनगरला जायला निघणार.

* * * *

सकाळीं सात सव्वासातला आमच्या मोटरबसनें ' उडी ' सोडली. समोर दूरवर दिसणारें हिमाच्छादित पर्वतशिखर रौप्यराशीसारखें चमचमत होतें. कोंवळ्या, सोनेरी उनांत मिसळलेला सौम्य, शीतल वारा उतारूंच्या अंगांवर नाजूक रोमांच उठवीत होता. सर्व उतारू प्रसन्न मुद्रेनें आजूबाजूचा देखावा पहात होते. बाजूच्या खोल दऱ्याखोऱ्यांतून खळाळत, फेंसाळत धांवणाऱ्या झेलम नदीचा धीरगंभीर आवाज कानांवर येत होता. मघाशीं एकच हिमाच्छादित शिखर दिसत होतं. आतां अनेक, एकाहून एक उंच पांढरीं शुभ्र शिखरें दिसूं लागलीं. मोटाररस्त्याच्या बाजूला पहाडाच्या पायथ्याशीं हिरवींगार शेतें दिसत होती.

' आतां आमचं शेत दिसेल, ' कौल कुटुंबांतल्या त्या तीन मुलींची आपसांत कुजबूज सुरू झाली.

संयुक्त प्रांतांतलें एक काश्मिरी कुटुंब आमच्या मोटारीत होतें. त्या तीन मुलींच्या म्हाताऱ्या आईचें 'उडी' आणि 'श्रीनगर' यांच्यामध्यें असलेल्या 'बारामुल्ला ' गांवांत स्वतःचें घर होतें. स्वतःच्या तीन मुली, मोठ्या मुली-

चा नवरा व तिचा म्हातारा सासरा यांना घेऊन दरवर्षाप्रमाणें म्हातारी यंदाही बारामुल्ल्याला जात होती. म्हातारी स्वस्थ होती, पण त्या मुलींची सारखी बडबड चालू होती. मोतीलाल नेहरूसारखी भव्य आणि रुबाबदार शरीरयष्टि असलेला, मोठ्या मुलीचा तो म्हातारा सासरा दोन्ही डोळ्यांनीं आंधळा होता. ड्रायव्हरजवळच्या जागेवर बसून त्याची सारखी टकळी चालू होती. तरुणपणापासून कित्येक वेळां तो काश्मिरांत राहून गेला होता. आतां त्याला कांही एक दिसत नव्हतें; तरी पण मोटार एखाद्यागांवांतून जाऊं लागली की, ‘ हें अमुक गांव असेल नाहीं ? ’ म्हणून तो मोठ्यानें विचारायचा. एखादे वेळीं भलत्याच गांवचें नांव तो घ्यायचा. पण म्हाताऱ्याला राग येईल म्हणून आपसांतल्या गोष्टीसुद्धां हलक्या आवाजांत करणारी त्याची सून आणि तिच्या बहिणी तें गांव वेगळें असूनही ‘ हां बाबाजी ! ’ म्हणून त्याला सागायच्या; आणि मग एकमेकींकडे बघून हळूच हंसायच्या !

त्यांचं शेत आणि शेतकऱ्याचें खोपट दिसूं लागलें. काश्मिरी शेतकऱ्याचें खोपट मोठें मजेदार असतें. पहाडाच्या पायथ्याशीं पहाडाला लागूनच तें बांधलेलें असतें. खोपटाची मागली भिंत म्हणजे पहाडच. बाजूला दोन शेणमातींच्या भिंती, पुढें दरवाजा, आणि वर शेणमातीचें सपाट सारवलेलें छप्पर. या छप्परावर मुलेंबाळें खेळत असतात; आणि बाजूच्या रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या मोटारीची गंमत पहात असतात. कौल कुटुंबाचें शेत जवळ येऊं लागलें तशी त्या मुलींत एकच गडबड उडाली. शेताजवळ मोटार आल्याबरोबर त्यांनी ड्रायव्हरला मोटार उभी करावयाला सांगितलें. मोटार उभी राहिल्यावर मोटारींतूनच त्यांनी शेतकऱ्याला हाका मारल्या. तांबूस गोऱ्या रंगाचा, काळींकुट्ट लक्तरें अंगावर लोंबणारा तो म्हातारा शेतकरी खोपटाचें दार उघडून बाहेर आला. आपली म्हातारी धनीण आणि तिच्या मुली पाहून त्याचा आनंद चेहऱ्यावर मावेनासा झाला. त्याचा चेहरा खुलून तकतकूं लागला. त्याच्या डोळ्याभोंवतालच्या सुरकुत्या अधिकच दाट झाल्या.

“ खाली उतरून या ना थोडा वेळ शेतांत, ” तो विनवूं लागला.

" छे, छे, आतां आधीं बारामुल्लयाला गेलं पाहिजे. मोटारींत इतर लोक आहेत, " मुली म्हणाल्या, " येऊं उद्यां परवां फिरत फिरत. "

" मक्कीचं पीक कसं आहे यंदा ? " म्हातारीनें विचारलें.

" बरं आहे,—कांहीं वाईट नाही; " नम्रपणें हंसत तो सांगत होता.

" तुझीं मुलंबाळं ? "

" मोठी मुलगी महिन्यापूर्वी बाळंत झाली आहे,—तिला मुलगा झाला आहे; आणि गाय पण व्याली आहे—" त्याचे डोळे आनंदानें लखलखत होते, " वासरूं दाखवायला आणूं ? " त्यानें एखाद्या निरागस बालकाच्या उत्साहानें विचारलें.

" छे, छे, वासरूं कशाला आणतोस इकडे ? " त्या मुली त्याच्याकडे पाहून मोठ्यांदा मिस्किलपणे हंसत म्हणाल्या. त्याच्या उत्साहावर विरजण पडलें. त्याचा चेहरा गोरामोरा झाला.

" बरं—नाहीं, " तो स्वतःशींच पुटपुटला आणि खोटं हास्य तोंडावर आणून त्यांच्याकडे पाहूं लागला.

मुलीचा मुलगा बाहेर दाखवायला आणायचा सोडून वासराला आणूं का, म्हणून विचारण्याच्या त्याच्या मूर्खपणाचें त्यांना राहून राहून हंसूं येत होतें. मोटार पुढें चालूं झाली होती. तो दोन्ही हात वर करून मोटार दूर जाईपर्यंत धनिणीकडे आणि तिच्या मुलींकडे पहात हात हालवीत होता. लहान मुलासारखा तुकतुकणारा त्याचा चेहेरा एकदम पडला, आणि तो गोरामोरा झाला, तेव्हां मला त्याची दया आली. मुलीला मुलगा झाला, यापेक्षांही गाईला वासरूं झालें, म्हणून आनंदानें वेडावलेला तो मूर्ख, कीं त्याला हंसणारे आम्ही मूर्ख ? मुलीला मूल झालें म्हणजे त्या चंद्रमौळी खोपटांतल्या चार उपाशी पोटांत आणखी एकाची भर पडली; पण गाईला वासरूं झालें याचा अर्थ मुलाबाळांच्या तोंडांत दूध पडेल, किंवा शेतांत राबायला आणखी एक बैल मिळेल !

* * *

आणि पुन्हां असाच एक प्रसंग घडला. नऊ हजार फूट उंचीवर

असलेल्या ' गुलमर्ग ' मधल्या बर्फ, धुकें, थंडी यांना कंटाळून आम्ही ' श्रीनगर ' ला परत जायला निघालों होतों. ' गुलमर्ग ' च्या पायथ्याशीं असलेल्या ' टंगमर्ग ' गांवांतून ' श्रीनगर ' ला जाणाऱ्या मोटारी सुटतात. पाऊस थांबलेला पाहून आम्ही घोडे बोलावले, आणि पहाड उतरूं लागलों. खालीं घोडे सोडले आणि उभ्या असलेल्या मोटारमध्यें बसलों. तास दीड तासानें उतारूंची जमवाजमव झाल्यावर पांच साडेपांचच्या सुमारास मोटार सुटली. ' टंगमर्ग ' हून ' श्रीनगर ' फक्त पंचवीसतीस मैल आहे. गगनभेदी पॉप्लर वृक्षांच्या दुतर्फा रांगांतून मोटार झपाट्यानें पुढें जात होती. इतक्यांत ' खर्र् खर्र् ' असा मोटारचा ब्रेक लागल्याचा आवाज झाला; आणि मोटार एकदम जागच्या जागीं थांबून आम्हां सर्वांना चांगलाच हादरा बसला. चाळीस पन्नास गरीब शेतकऱ्यांची रस्त्याच्या मध्येंच गर्दी जमली होती. एक शेतकरी स्त्री ऊर बडवून आक्रोश करीत होती. ' काय, झालं तरी काय ? ' म्हणून आम्ही बाहेर डोकावून पाहूं लागलों. एक तांबूस रंगाचा पुष्ट दांडगा बैल रस्त्यांत मरून पडला होता. आमच्या आधीं तिथून गेलेल्या एका मोटारीचा धक्का लागून तो बैल मेला होता म्हणे ! त्या बैलाच्या डोक्याजवळ आपले डबडबलेले डोळे फाटक्या, मळकट बाहीनें पुशीत तो शेतकरी उकिडवा बसला होता. बाजूला उभे असलेले इतर शेतकरी सुतकी चेहेरा करून शोकपूर्ण नजरेनें त्या दुःखी शेतकऱ्याकडे आणि धाय मोकलून रडणाऱ्या त्याच्या बायकोकडे पहात होते. त्या नवराबायकोंची समजूत कशी घालावी हेंच त्यांना सुचत नव्हतें. उकिडवा बसलेल्या त्या दुःखी शेतकऱ्याचा चेहेरा अजूनही माझ्या डोळ्यासमोर दिसतो. पाठीवर एक मोठें थोरलें चाक घेऊन मुंबईच्या रस्त्यावरून चाकूसुऱ्यांना धार लावणारे बसकट मंगोलियन चेहेऱ्याचे लोक फिरतात ना ?—तसा त्याचा चेहरा होता. त्याचे ते डबडबलेले डोळे, आणि त्याचा तो कारुण्यपूर्ण, ओढलेला चेहेरा ज्यांनीं पाहिला असेल, ते तो विसरणें शक्य नाहीं......

आमचा ड्रायव्हर त्या गर्दी केलेल्या शेतकऱ्यांच्या अंगावर खेंकसल्या-बरोबर त्यांच्यापैकीं कांहीं बाजूला झाले आणि मोठ्या मिनतवारीनें रस्त्याच्या

कांठानें मोटार वळवून ड्रायव्हरनें मोटार पुढें काढली. कुणी तरी जवळचं रक्तामांसाचं माणूस मरावं आणि आजूबाजूला बसलेल्या त्याच्या प्रियजनांना ओढून बाजूला काढणं जड जावं, त्याप्रमाणें एका मेलेल्या बैलासाठीं रस्त्यावर एवढा मोठा गोंधळ घालणाऱ्या शेतकऱ्यांना पाहून मोटारीच्या उतारूंमध्यें हास्यविनोद चालला होता. माझ्याहि डोक्यांत विचारचक्र फिरत होतें. भयंकर दारिद्र्यांत रुतलेल्या या काश्मिरी शेतकऱ्यांचं खरोखरच कुणी जवळचं माणूस मेलं तर त्यांना वाईट वाटेल; पण ' सुटला बिचारा दुःखांतून नी उपासमारींतून ' म्हणून थोडंसं बरंहि वाटण्याचा संभव आहे......पण बैल मेला...चारचौघांचा अन्नदाता गेला, सावकाराचं कर्ज काढून विकत घेतलेला बैल कर्ज फिटायच्याच आंत भर जवानींत गेला... आतां नवा बैल !... बैलाचा मृत्यु.... काळोख झपाट्यानें पडत होता. गगनभेदी पॉप्लर वृक्षांच्या दुतर्फा रांगांतून मोटार पुढला रस्ता वेगानें कापीत होती !

---

## वृत्तिका ( Reportage )

[ ' रिपोर्टाज् ' ( Reportage ) नांवाचा एक नवीन वाङ्मयप्रकार पहिल्यांदा रशियन वाङ्मयांत आणि आतां इंग्लिश व इतर युरोपियन वाङ्मयांत रूढ झाला आहे. आपण त्याला मराठींत ' वृत्तिका ' असं नांव देऊं. ' रिपोर्टिंग् ' ( Reporting ) किंवा ' इतिवृत्त ' आणि ' रिपोर्टाज् ' किंवा ' वृत्तिका ' यांतला फरक असा, कीं इतिवृत्तांत घडलेले किंवा पाहिलेले सर्व तपशील आपण देतों. ते तपशील वाचल्यानंतर त्यांतून त्यांच्या पलीकडचा असा कांहीं अर्थ किंवा ध्वनि निघत नाहीं. म्हणून ' इतिवृत्ता ' ला ललितवाङ्मयांत स्थान नाहीं. ' वृत्तिका ' म्हणजे अर्थपूर्ण ' इतिवृत्त ' ( Significant reporting ) असं थोडक्यांत म्हटलं तरी चालेल. जीवनांत दिसणारे सर्व तपशील ललितकृतींत येत नाहींत. थोडे निवडकच येतात. म्हणूनच Art is less than life असं आपण म्हणतों. पण जीवनांत नुसते अनेक तपशील दिसतात; यापेक्षां अधिक कांहीं त्यांत दिसत नाहीं. कलावंत यांतले निवडक तेवढेच घेतो; आणि

त्यांना एक आकार ( Design किंवा Pattern ) देऊन त्यातून कांहीं तरी अर्थ ध्वनित करतो. आणि म्हणूनच Art is also more than life असं आपण म्हणतों. उदाहरणार्थ, हार्डीची ' टेस् ' ही कादंबरी घेऊं. शोकपूर्ण प्रणयकथा आयुष्यांत पुष्कळ घडतात. पण ' टेस् ' आणि ' एंजल क्लेअर ' यांच्या प्रेम–प्रकरणांतले कांही विशिष्ट तपशीलच हार्डीनें रंगविले; आणि ते अशा खुबीनें रंगवले, कीं कादंबरी वाचून झाल्यानंतर वाचकांच्या मनावर नकळत हार्डीचं विशिष्ट दुःखान्त जीवनविषयक तत्त्वज्ञान,—' माणसं एका अन्ध, अजाण, विश्वव्यापी शक्तीच्या हातांतलीं निव्वळ खेळणीं आहेत,'—ठसवलं गेलं. वृत्तपत्रांतलें ' इतिवृत्त ' किंवा ' रिपोर्टिंग ', आणि ' वृत्तिका ' किंवा रिपोर्टाज् यांत असाच कांही तरी फरक असला पाहिजे असं मला वाटतं.

काश्मीरच्या प्रवासांत पाहिलेल्या एकदोन प्रसंगांवर वरील ' बैलाचा मृत्यु ' ही ' वृत्तिका ' लिहिलेली आहे. ती कितपत यशस्वी झाली आहे तें सांगतां येत नाहीं. तो एक प्रयत्न आहे इतकेंच. ]

---

# मला येणारीं पत्रें : : ३

ज्या अनेक गोष्टींची मला भीति वाटते त्यांपैकीं मला येणाऱ्या पत्रांना उत्तर लिहिणं ही एक आहे. भीति वाटण्याचं कारण एकच. आलेल्या पत्रांना काय उत्तर लिहावं आणि कसं लिहावं या विचारानं मी इतका कातून जातों की, नकोत तीं पत्रं आणि नको तें त्यांना उत्तर लिहिणं असं मला होऊन जातं. आणि मग उद्यां उत्तर लिहीन, परवां लिहीन असं करीत शक्य तितक्या लांबणीवर हें काम मी ढकलीत असतों. आणि केव्हा केव्हां तर कायमचंच लांबणीवर टाकतों. नको असलेली गोष्ट आपण शक्य तितकी टाळण्याचा प्रयत्न करतों ना—त्यांतलाच हा प्रकार. खरं म्हटलं तर पत्राला उत्तर लिहिणं यांत काय कठीण आहे ?—पण मला तें खरोखरच फार कठीण वाटतं. मनासारखं उत्तर लिहितां येईल कीं नाहीं, याची सारखी धाकधूक माझ्या मनाला डाचीत असते. माणसाचं जें हृद्गत असतं,—माणसाला जें वाटतं तें जसंच्या तसं पत्रांत आलं पाहिजे असं मला वाटतं. पण भाषा ही एक कृत्रिम गोष्ट आहे आणि भाषेशिवाय तर हृद्गत व्यक्त करतां येत नाहीं. आपलं हृद्गत भाषेंतून व्यक्त करतांना त्याला कृत्रिमतेचा वास तर लागणार नाहीं ना ? आपणाला जिवाभावानं जें म्हणायचं आहे तें सवंग तर दिसणार नाहीं ना ?, ही धास्ती मला सारखी भेंडावीत असते. किती वेडगळपणाची कल्पना आहे ही ! भाषेशिवाय आपलं संपूर्ण हृद्गत व्यक्त करण्याचं दुसरं कांहीं

तरी सांधन माणसाजवळ आहे का ? पण मला आपलं असं वाटतं खरं. माणसाचं हृदय पारदर्शक असावं आणि विजेच्या दिव्यांतले केसर जसें लख्खदिशी पेटतात त्याप्रमाणें कोणतेहि विचार किंवा विकार माणसाच्या मनांत आले कीं ते लख्खकन् दुसऱ्याला दिसावे,-मध्यें भाषेचा पडदाच नसावा असंच वाटण्यासारखं आहे हें ! असं जर असतं तर वाईट विचार किंवा दुष्ट भावना कुणाच्याच मनांत आल्या नसत्या. सर्वच सज्जन, प्रामाणिक झाले असते. जग नंदनवन झालं असतं—पण असं असतं तर ! भौतिकवादाच्या,- विवेकवादाच्या,— व्यावहारिकतेच्या मी गप्पा मारतों खऱ्या; पण माझ्या मनाच्या कुठल्या तरी कोपऱ्यांत अद्‌भुतरम्यतेची,— आदर्श सृष्टीची जी एक चोरटी इच्छा दडून बसली आहे तिचंच हें प्रदर्शन आहे, दुसरे काय ? तें कांहीहि असो. जें जें सहजस्फूर्त ते तें चांगलं असं मला वाटतं. आपणाला जसं वाटतं तसंच्या तसं सर्व भाषेंत उतरतां येईल कीं नाहीं, या भीतीमुळेंच कथा—कादंबऱ्यांचीं कथानकं डोक्यांत कित्येक दिवस घोळत असतां लिहीन कधीं तरी, लिहीन कधीं तरी म्हणून वर्षानुवर्ष मी तीं लिहिण्याचं पुढें ढकलीत असतों; किंवा लिहीन उद्यां, लिहीन परवां म्हणून पत्रांचीं उत्तरं लिहिण्याची टाळाटाळ करीत असतों. कमाल आहे बुवा तुझ्या आळशीपणाची, म्हणून लोक मला नेहमीं चिडवीत असतात आणि मीहि त्याला हरकत घेत नाहीं; पण मला वाटतं माझ्या मनाला डांचणारी ती विशिष्ट भीति हेंच माझ्या या चालढकलीचं खरं कारण असावं. कीं आतां सुविख्यात झालेल्या माझ्या आळशीपणाला छपविण्याकरितां हें एक नवीनच गोंडस तत्त्वज्ञान मी शोधून काढतों आहे ? कुणाला ठाऊक ! स्वतः दुसऱ्यांना पत्र लिहिणं आणि दुसऱ्यांच्या पत्रांना उत्तर देणं म्हणजे मला ती एक सक्तमजुरीच वाटते हें खरं. ही झाली खाजगी पत्रांची गोष्ट !

* * *

लेखक म्हणून मला जीं पत्रं येतात तीं बहुधा माझं एखादं पुस्तक किंवा लेख वाचून खूष झालेल्या चाहत्यांचीं असतात. अशीं पत्रं फ़ारशीं येतात असं नाहीं. पण अधूनमधून एखादं दुसरं पत्रं येतं. स्वाक्षरी

मागण्याकरितां बरींचशीं पत्रं येतात. मात्र हीं सर्व पत्रं तोंड भरून स्तुति करणाऱ्या चाहत्यांची असतात म्हणून माझ्यासारखा लोकप्रिय लेखक दुसरा कुणीच नाहीं असं मी मुळींच समजत नाहीं. कारण ज्यांना माझीं पुस्तकं आवडतात ते पत्रं लिहितात; पण ज्यांना आवडत नाहींत ते जागच्या जागीं दांतओठ खात मला शिव्या देत बसत असतील. त्यांची संख्या आवडणारांपेक्षां जास्त असली म्हणून तें मला थोडंच कळणार आहे? आधींच रागवलेले ते लोक पत्र पाठवून माझ्यासाठीं पोस्टाचा खर्च थोडाच करणार? तेव्हां असला भलताच गैरसमज मी करून घेत नाहीं. मात्र या पत्रांपैकीं कांहीं विशिष्ट पत्रं वाचून मला अपरिमित आनंद होतो, आणि माझा आत्मविश्वासहि दुणावतो. हीं पत्रं म्हणजे ज्यांत माझ्या साहित्यकृतीचा मोठेपणा वर्णन केलेला नसतो, किंवा 'किती सुंदर लिहितां तुम्ही!' असे स्तुतिपूर्ण उद्‌गारही नसतात; पण ज्यांमध्यें एकादा साहित्यांतलं बरंवाईट कांहीं न समजणारा मनुष्य 'तुमच्या अमुक कवितेंतली किंवा अमुक लघुकथेंतली अमुक एक विशिष्ट गोष्ट मला कमालीची पटली. कसं हो समजलं हें तुम्हांला?' असं लिहितो तो. एकाद्या थोर टीकाकारानं केलेल्या स्तुतीपेक्षांहि या पत्रांतल्या असल्या सहजस्फूर्त उद्गारांनीं मला अधिक आनंद होतो. टीकाकारांच्या शब्दांची किंमत मी कमी लेखतों असा याचा अर्थ नव्हे. विश्वविद्यालयाची पदवी प्रत्येक ज्ञानेच्छूला हवीशी वाटते, आणि तिची किंमतहि त्याला कळते; पण खऱ्या ज्ञानपिपासूला ज्याप्रमाणें जगाच्या विविध अनुभवांतून मिळणाऱ्या ज्ञानाची मजा कांहीं औरच वाटते, त्यांतलाच हा थोडासा प्रकार आहे. असलीं पत्रं वाचलीं म्हणजे आपण नुसते शब्दांचे कारागीर नाहीं, तर कळत अगर न कळत म्हणा, शब्दांच्या जाळ्यांत आपण जीवनाचा कांहीं तरी जिवंत भाग पकडूं शकतो याची खात्री वाटते. नुसत्या शब्दांच्या कसरतीनें किंवा कोट्यांच्या आतषबाजीनें साहित्यशास्त्रविशारदांच्या डोळ्यांत एक वेळ धूळ टाकतां येईल; पण सामान्य माणसाला असल्या लटपटींनीं चकवितां येणार नाहीं. साहित्यकृतींत जीवनरसाचा थोडाबहुत ओलावा आढळला तरच सहजस्फूर्त आनंदानें सामान्य वाचक तुमच्या पाठीवर थाप मारणार;

आणि माझ्या मतें वाङ्मयाची हीच अंतिम कसोटी. ‘ चांदरात ’ प्रसिद्ध झाल्यावर माझ्यावर स्तुतीचा वर्षाव करणारीं पुष्कळ पत्रं मला आलीं, आणि माझ्या काव्यांत कांहीं एक तथ्य नाहीं अशा प्रकारचे अभिप्रायहि मीं पुष्कळांच्या तोंडून ऐकले. पण शेले, कीट्ससारखं प्रेमकाव्य मराठींत लिहावं तुम्हीच, असं म्हणणाऱ्या पत्रांपेक्षां, किंवा आहे काय त्यांच्या काव्यांत-रेडिओवर किंवा इतरत्र गाणाऱ्यांच्या गोड गळ्यामुळें त्यांचीं काव्यें इतकीं लोकप्रिय झालीं, असं सांगणाऱ्या अभिप्रायापेक्षां, मला बिनमोल वाटतात तीं पत्रं तिसऱ्याच प्रकारचीं. असल्या पत्रांचीं एकदोन उदाहरणें देतों. प्रेम—विवाह करून एकदोन वर्षं अत्यंत सुखाचा संसार केल्यानन्तर एकाएकीं जिवाची सोबतीण मृत्युमुखीं पडलेल्या एका तरुण वकिलाचं एक पत्र एकदां मला आलं; “ आता कुठेंही फिरतांना तुमची ‘ चांदरात ’ मी खिशांत ठेवतों; माझं प्रेम, माझं यौवन, यौवनांतलीं माझीं सारीं सुखदुःखं त्या पुस्तकांत आहेत. मी ते पुन्हां पुन्हां वाचतों ” असे उद्गार त्याच्या पत्रांत होते. तें पत्र वाचतांना माझ्या डोळयांत अश्रू उभे राहिले. एकदां एक प्रख्यात चित्रपटदिग्दर्शक मला म्हणाले, “ तुमचं ‘ तुटलेले तारे ’ पुस्तक मी सहज टेबलावर ठेवलं होतं. माझ्या बायकोनें तें चाळलं, आणि वाचतां वाचतां तें तिला इतकं आवडलं कीं, तिनं तें सर्व वाचून काढलं; फारच आवडलं तिला. आश्चर्य म्हणजे ती विशेष शिकली सवरलेली मुळींच नाहीं. घरकाम करणं आणि मुलंबाळं संभाळणें, हेंच तिचं नेहमीचं जीवन. तुमचं वाङ्मय आणि साहित्य तिला कांहींच कळत नाहीं...” त्या विख्यात दिग्दर्शकानें किंवा एखाद्या थोर साहित्यिकानें माझ्या लघुनिबंधाची स्तुति केली असती तर मला जितका आनंद झाला असता त्याच्या सहस्रपट आनंद मला त्या उद्गारांनीं झाला. माझ्या अन्तःकरणाच्या अगदीं आंतल्या गाभ्याला गुदगुल्या झाल्या. ती बाई साहित्यिक नाहीं किंवा टीकाकार नाही,-नुसती एक माणूस आहे, आणि तिला तें पुस्तक आवडलं, हेंच माझं भाग्य. माझ्या निबंधात कुठें तरी मानवी जीवनाचा धगधगीत, रसरशीत तुकडा आहे याची जाणीव मला तिच्या अभिप्रायानें करून दिली. मला कां कृतज्ञता वाटूं नये !

या असल्या पत्रांनीं आणि अभिप्रायानीं आपण फार मोठें माणूस आहों, असं मला वाटूं नये म्हणूनच कीं काय, माझ्या क्षुद्रपणाची मला पदोपदीं आठवण करून देणारीं,—भरपूर शिव्यांनीं भरलेलीं पत्रं संपादक म्हणून मला नेहमीं येत असतात. यांपैकीं बहुतेक प्रसिद्धीसाठीं लेख पाठवणाऱ्या नवीन लेखकांचीं असतात '...स्वतःला नवमतवादी,– तरुणांचे पुढारी म्हणवतां आणि माझ्यासारख्या तरुण, नवीन लेखकाचे लेख परत पाठवतां. लाज नाहीं वाटत ? ढोंगी कुठले ! ' एक पत्र म्हणतें; तर दुसरं म्हणतें, '...बंडखोर विचारांनीं भरलेला हा एक लेख तुमच्याकडे पाठवीत आहें. तुम्ही बंडखोर आहांत ना ? छापा तर ! नाहीं छापलात तर काय समजायचें तें मी समजेन. इतर संपादक अप्रामाणिक आहेतच, त्यांतलेच तुम्ही एक !...' एक कॉलेज–विद्यार्थी लिहितो, '...लोकशाहीचे पुरस्कर्ते म्हणून तुम्हीं माझी ही तक्रार छापलीच पाहिजे. आमच्या प्रिन्सिपॉलना घाबरण्याइतके तुम्ही भ्याड असाल असं मला मुळींच वाटत नाहीं. मात्र माझं नांव पत्राखालीं छापूं नका...' संपादकाला शूर, प्रामाणिक, बंडखोर, लोकशाहीवादी करण्याची कोण ही कळकळ !

* * * *

संपादक हा जनतेचा सेवक आहे, अशी लोकांची समजूत असते; आणि संपादकांना स्वतःचा अभिमान वाटावा अशीच ही गोष्ट आहे. पण संपादकाकडून सार्वजनिक सेवा करून घेण्याचा लोकांचा उत्साह केंव्हां केंव्हां भलत्याच थराला जातो. कुणाला खरं वाटणार नाहीं, पण मला एकदां पुढीलप्रमाणें पत्र आलं होतं;

"...गेले कित्येक दिवस पाहुण्यांनीं मला सतावून सोडलं आहे. मी भिडस्त असल्यामुळें मला कांहीं बोलतां येत नाहीं. तेव्हां तुम्ही आपल्या पत्रांतून त्यांच्यावर सडकून टीका कराल काय ? त्यांचीं नांवं आणि पत्ते पुढीलप्रमाणें...अर्थात् माझ्या नांवाचा उल्लेख करूं नका !..."

* * * *

मला येणाऱ्या पत्रांचे हे असे दोन–तीन प्रकार आहेत. पत्रांबद्दल मला अगदीं मनापासून खरं खरं काय वाटतं असं कुणीं विचारलं तर मी म्हणेन, या विषयासंबंधीं माझी तिरंगी भावना आहे; पत्र लिहिण्याचा मला कंटाळा आहे; पण लोकांनीं मात्र स्तुतीचीं म्हणा, निंदेचीं म्हणा किंवा शिव्यांनीं भरलेलीं म्हणा, खूप खूप पत्रं मला लिहावीं; आणि वर पुन्हां मी उत्तरं लिहिलीच नाहींत, लिहायला विलंब लावला किंवा दोन-चार तुटक ओळींचंच उत्तर लिहिलं, तर माझ्यावर त्यांनीं रागावूं नये. कां रागावूं नये तें मी सुरवातीला सांगितलंच आहे. मी आळशी आहें,– मला अहंपणा झाला आहे म्हणून मी उत्तरं लिहीत नाहीं असं नाहीं, तर मला भीति वाटते !

# कांहीं सत्यछटा : : ४

आपल्या आयुष्यांतली एकादी सत्यकथा द्या, असें जेव्हां 'सत्यकथे-'च्या संपादकांनीं मला सांगितलें, तेव्हां माझ्यासमोर एक प्रश्नच उभा राहिला. प्रत्येकाच्या आयुष्यांत सांगण्यासारख्या सत्यकथा पुष्कळ असतात; पण जो ललित लेखक असतो त्यानें आपल्या वाङ्मयांत कुठें ना कुठें तरी त्या सांगून टाकलेल्या असतात. तेव्हां मूळ नांवें सांगून त्याच कथा पुन्हा सांगण्यांत स्वारस्य काय? माझ्यापुढें प्रश्न उभा राहिला तो यामुळेंच. सध्यां सत्यकथा अशी सांगतां येण्यासारखी माझ्याजवळ कांहीं नाहीं. दोनचार मजेदार प्रसंग मला आठवतात. नाट्यछटा या नांवाच्या चालीवर त्यांना आपण 'सत्यछटा' म्हणूं पाहिजे तर.

× × × ×

कांहीं वर्षांपूर्वी सुप्रसिद्ध इंग्लिश कादंबरीकार टॉमस् हार्डी याच्या कादंबऱ्यांवर मी अगदीं वेडा होऊन गेलों होतों. त्यांतल्या त्यांत त्याची 'Tess' ही कादंबरी मला अतिशयच आवडली होती; इतकी कीं, दहापंधरा दिवस त्या कादंबरींतलीं पात्रें आणि त्यांचीं सुखदुःखें यांखेरीज मला दुसरें कांहीं सुचत नव्हतें. टेस् आणि एंजल क्लेअर माझ्या डोळ्यासमोर दिसत होती. टेस् ही एक खेडवळ इंग्लिश मुलगी आहे. त्या वेळेला खरीखुरी इंग्लिश खेडवळ मुलगी मी पाहिलेली नव्हती. इंग्रजी वाङ्मय वाचून आणि चित्रें बघून मीं काय कल्पना करूं शकत होतों तेवढीच. टेस् अशी दिसत

असेल, तिचे डोळे निळे असतील, केंस सोनेरी असतील, छातीकडे बंद बांधावयाचे असतात अशा प्रकारचा तंग फ्रॉक इंग्लिश खेडवळ मुलीचा असतो; तसाच तिच्या अंगावर असेल, वगैरे वगैरे चित्र मीं डोळ्यापुढें उभें केलें होतें.

याच विचारांत असतां ग्रँट् रोड स्टेशनच्या समोर जुना बाजार आहे त्या बाजूनें मी येत होतों. इतक्यांत एका जरीपुराणेवाल्याच्या दुकानांत लावलेलें एक कॅलेंडर माझ्या दृष्टीला पडलें. गवताच्या गंजी मागें पडल्या आहेत, त्यांवर पिवळा सूर्यप्रकाश पडला आहे. आणि सोनेरी केंस असलेली, निळ्या डोळ्यांची, बंदांचा तंग फ्रॉक घातलेली एक खेडवळ, तरुण इंग्लिश मुलगी पुढें उभी आहे असें तें चित्र होतें. हार्डीची 'टेस्' अशीच असली पाहिजे, असें एकदम मला वाटलें. आणि तें कॅलेंडर मीं विकत घेतलें.

कांहीं दिवसांनीं 'ग्रॅफिक्' किंवा तसेंच कुठलेंसें एक सचित्र इंग्लिश साप्ताहिक मी चाळीत होतों. तें सबंध साप्ताहिक सुंदर आर्ट पेपरवर छापलेलें असे. आंत अनेक चित्रें होतीं. हार्डीच्या वेसेक्स परगण्यांतल्या कांहीं हौशी तरुणतरुणींनीं 'हार्डी प्लेअर्स' नांवाची एक नाट्यसंस्था काढली होती. आणि हार्डीनें लिहून दिलेलीं नाटकें ते करीत. 'टेस्' या कादंबरीवर आधारलेलें एक नाटक हार्डीनें त्यांना लिहून दिलें होतें. त्या नाटकांत 'टेस्'चें काम केलेल्या नटीचें एक चित्र या साप्ताहिकांत मला दिसलें. बाजूच्या लेखांत आपल्या कल्पनेबरहुकूम 'टेस्'चें काम करणारी नटी आहे, असें हार्डीनें म्हटल्याचें लिहिलें होतें. या नटीचा चेहरा, कपडे आणि एकंदर रूप यांचें माझ्या कॅलेंडरमधल्या चित्राशीं कमालीचें साम्य होतें. प्रतिभावान् लेखक आपल्या वाचकांच्या मनांवर किती विलक्षण परिणाम करूं शकतो याचें हें उदाहरण आहे, असें मला वाटतें.

× × × ×

लेखकाला जे अनेक मजेदार अनुभव येतात, त्यांतले अत्यंत मजेदार,

त्याचीं पुस्तकें न वाचतां त्याची स्तुति करणारे लोक त्याला भेटतात तेव्हांचे असतात, असें मला वाटतें. एकदां एका गांवीं मी व्याख्यान द्यावयाला गेलों होतों. ज्या संस्थेतर्फें माझें व्याख्यान होतें त्या संस्थेचे प्रमुख आश्रयदाते गांवांतले एक श्रीमंत गृहस्थ होते. त्यांना खूष करण्या करतां संस्थेच्या चालकांनीं त्यांच्या थोरल्या चिरंजीवांना माझ्या व्याख्या-नाचे अध्यक्ष केले होते. माझ्याविषयींची थोडीशी माहिती त्यांनीं कुणाला तरी विचारून ठेवलेली असणार. पण आयत्या वेळी घोटाळा झाला. श्रोत्यांत बरींचशीं शाळेंतलीं मुलें होतीं. त्यांना माझ्या पुस्तकांचीं नांवें आणि पुस्तकें कशासंबंधीं आहेत त्याची माहिती होती. अध्यक्ष माझी ओळख करून द्यायला उभे राहिले.

" काणेकरांची ' चांदरात ' ही उत्कृष्ट कादंबरी तुम्ही वाचलीच असेल ! " अध्यक्ष रंगांत येऊन म्हणाले.

" अहो, ' चांदरात ' हें कवितांचं पुस्तक आहे ! " एक पोरगा ओरडला.

पण अध्यक्ष तेवढयावर कुठले थांबायला ? ते पुढें बोलूं लागले, " पण ' पिकलीं पानें ' ही कादम्बरी खात्रीनें थोर आहे—"

" अहो, ते लघुनिबंध आहेत !" आणखी दोन मुलें ओरडलीं.

आतां मात्र अध्यक्षांचा चेहरा अगदीं पडला.

" माझ्यापेक्षां तुम्हांलाच त्यांची जास्त माहिती दिसते—तेव्हां मी खालीं बसतों—" असें कांहीं तरी चांचरत चांचरत म्हणत ते खालीं बसले.

× × × ×

सिनेमांत आतां खूपच गाजलेले असे एक सुप्रसिद्ध नट आहेत. पूर्वीं ते नाटककम्पनींत स्त्रीपार्टी होते. आतां ते लठ्ठ आहेतच; पण तेव्हांही ते खूपच लठ्ठ होते. स्त्रीपार्ट करण्याचे त्यांचे ते शेवटचे शेवटचे दिवस होते. एका विशेषशा प्रसिद्ध नसलेल्या आणि आतां स्मृतिशेष झालेल्या नाटककम्पनींत ते होते. मी त्या वेळेला शाळेंत होतों. कुणीं

तरी एक फुकट पास मला दिला होता. म्हणून त्या कम्पनीचें ' सौभद्र ' नाटक पाहावयाला मी गेलों होतों. सुभद्रेचें काम अर्थात् नटवर्य × × करीत होते. सुभद्रा मूर्च्छित पडते, आणि घटोत्कच तिला उचलून नेतो, तो प्रवेश चालू होता. त्यापूर्वी बालगंधर्वांचें ' सौभद्र ' मीं पाहिलें होतें. बालगंधर्व त्या वेळीं अत्यंत सडपातळ होते, आणि सुभद्रेला घटोत्कच लीलेनें खांद्यावर उचलून आंत नेत असे. पण या सुभद्रेला खांद्यावर उचलून घेऊन आत नेणारा घटोत्कचपार्टी कंपनीत असणें शक्यच नव्हतें. तेव्हां सुभद्रेला उचलायला घटोत्कचानें हात घातला कीं पडदा पाडावयाचा, आणि प्रवेश संपवावयाचा असा चालकांचा विचार होता, असें मला वाटतें.

घटोत्कच सुभद्रेच्या मानानें अगदींच लुकडा दिसत होता. त्यानें आपलें जोरदार, राक्षसी भाषण केलें, आणि मूर्च्छित पडलेल्या सुभद्रेला हात घातला. तितक्यांत ठरल्याप्रमाणें पडदाही वरून खालीं येऊं लागला. पण घटोत्कचाच्या दुर्दैवानें आंत पडद्याच्या दोरीची गुंतागुंत होऊन पडदा अर्ध्यावरच अडकून लोंबूं लागला. एक मिनिट झालं, दोन झालीं, पांच झालीं, सहा झालीं, पडदा खालींच येईना !

घटोत्कच सुभद्रेभोंवतीं हात टाकून सारखा ' ऊं ! ऊं ! ! ' करून सुभद्रेला उचलण्याचा प्रयत्न करीत होता, किंवा तसा अभिनय करीत होता म्हणा ! सारं थिएटर खदखदां हंसत होतं, आणि पिटमधले लोक शिट्या मारीत होते. घटोत्कच श्रमापेक्षांसुद्धां ' आतां काय करावं ? ' या भीतीनें घामाघुम झाला होता. लोकांचं हंसणं आणि त्या शिट्या ऐकून तर तो अगदींच अर्धमेला झाला. शेवटीं पिटमधला एक प्रेक्षक ओरडला, ' ए × × तूं राक्षस ना ? आणि तुला एक बाई उचलत नाहीं ? " आणखी जोराचा हंशा पिकला. शेवटीं एकदांचा पडदा सुटला आणि पडला एकदांचा खालीं !

# प्रो. फडके : : ५

## व्यक्ति,—वाङ्मय नव्हे !

प्रो. फडके या व्यक्तीविषयीं मला काय वाटतें तें लिहिण्याविषयीं जेव्हां 'धनुर्धारी'च्या संपादकांनीं आग्रह केला तेव्हां दोनचार मजेदार आठवणी माझ्या डोळ्यांसमोर आल्या. प्रो. फडके मोठे गर्विष्ठ आणि तुसड्या स्वभावाचे आहेत असें कितीतरी जणांनीं, मी फडक्यांना भेटण्यापूर्वी, मला सांगितलें होतें. एखाद्या माणसाची कुणी निंदा केली कीं, त्याला भेटण्याची मला अनावर इच्छा होते. पण एखाद्या मोठ्या किंवा आपणाला आवडणाऱ्या माणसाला उगाच भेटायला जाणें मला आवडत नाहीं. किंबहुना मला तें जमतच नाहीं. प्रो. फडक्यांची आणि माझी पहिली भेट मोठ्या विचित्र परिस्थितींत झाली आणि माझ्या दृष्टीनें तरी ती भेट अत्यंत संस्मरणीय आहे. कांहीं कामाकरतां, मला वाटतें १९३४ सालीं, मी कोल्हापूर येथें गेलों होतों. सुप्रसिद्ध दिग्दर्शक भालजी पेंढारकर यांनीं कोल्हापूर सिनेटोनच्या स्टूडिओंत मला आपल्या बरोबर जेवावयाचें निमंत्रण दिलें होतें. जेवण करून दुपारीं मी स्वस्थपणें स्टूडिओंतल्या भालजींच्या खोलींत झोंपलों होतों. इतक्यांत राजाराम कॉलेजमधला माझा एक विद्यार्थी स्नेही तिथें आला; आणि हालवून मला जागा करून कॉलेजमध्यें चला म्हणून सांगूं लागला.

'कशाला ?' मीं विचारलें.

‘ आतां ३ वाजतां आमच्या कॉलेजांत तुमचं व्याख्यान ठेवलं आहे; आणि प्रो. फडके अध्यक्ष आहेत.’ तो म्हणाला.

‘ म्हणजे ?’ मीं विचारलें. माझा चेहरा गोरामोरा झाला होता. माझ्या सर्वांगाला कांपरें सुटलें होतें. तोंपर्यंत उभ्या जन्मांत मीं कधीं व्याख्यान दिलें नव्हतें, आणि कधीं देईन असेंही मला वाटलें नव्हतें. व्यासपीठावर जायच्या कल्पनेनेंही माझ्या डोळ्यांसमोर काजवे चमकत. आणि आतां कॉलेजच्या मुलांसमोर व्याख्यान द्यायचें आणि तेंही प्रो. फडक्यांच्या अध्यक्षतेखालीं !

‘ अरे पण मी बोलतों म्हणून तुला सांगितलं कुणीं ? आणि तूं कॉलेजात व्याख्यान ठरवलंस कुणाला विचारून ?’ मी म्हणालों.

‘ तें कांहीं नाहीं, तुम्ही कोल्हापुरांत आल्याचं मला सकाळीं कळलं आणि आम्ही कॉलेजमध्यें व्याख्यान जाहीर करून टाकलं.’

‘ विषय वगैरे काय ?’

‘ तुम्हांला वाटेल त्या विषयावर बोला ! पण चला लवकर. तिथें मुलं जमून राहिलीं असतील आणि अप्पासाहेबही वाट पहात असतील.’

मला काय करावं तेंच सुचेना. मीं कपडे घातले आणि काय होईल तें होवो असा विचार करून त्याच्या बरोबर चालायला लागलों. मला वाटतें, २०–२५ मिनिटें मी कांहींतरी बोललों, पण प्रो. फडक्यांनीं सुंदर समारोप करून एकंदर कार्यक्रम यशस्वी केला.

* * * *

तें माझें पहिलें सार्वजनिक भाषण आणि त्याचे अध्यक्ष प्रो. फडके. जो मनुष्य अत्यंत गर्विष्ठ आणि तुसड्या स्वभावाचा म्हणून माझा समज करून देण्यांत आला होता त्यानें आपल्या गोड आणि दिलखुलास वागणुकीनें मला पहिल्याच भेटींत जिंकलें. आपला विद्यार्थी शोभेल अशा एका लेखकाशीं—प्रो. फडके १९१७ सालीं एम्. ए. झाले, म्हणजे त्या वेळीं मी इंग्रजी २ ऱ्या इयत्तेंत असेन !—पहिल्याच भेटींत इतक्या सौजन्यानें आणि खेळाडू वृत्तीनें जो गृहस्थ वागला, तो ज्यांच्याशीं

गर्विष्ठपणें आणि तुसडेपणानें वागला असेल, ते लोक तुसडेपणानेंच वागविण्याच्या लायकीचे असले पाहिजेत असें मला वाटतें. याखेरीज दुसरें कांहीं कारण मला सुचत नाहीं. कदाचित् माझें नशीबच विशेष असेल. कारण दुसऱ्या एका बाबतींत मला असाच अनुभव आला आहे. एका प्रकाशकासंबंधीं, तो नेहमीं लेखकांना बुडवतो, एक छदाम लेखकांच्या हातीं लागूं देत नाहीं, अशी अनेकांनीं माझ्याकडे ओरड केली होती. पण इतर सर्व प्रकाशकांनीं कमी अधिक प्रमाणांत मला रखडविलें आहे—नेमक्या याच प्रकाशकानें पुस्तक प्रसिद्ध झाल्याबरोबर दुसऱ्या दिवशीं एका चेकनें माझ्या मोबदल्याची रक्कम देऊन टाकली !

* * * *

फडक्यांशीं माझी एक लहानशी चकमकही झडली आहे. पण त्यांतहि त्यांनीं जी खिलाडू वृत्ति दाखवली, तिच्यामुळें मीच शरमल्यासारखा झालों. या अंतर्बाह्य सरळ असलेल्या सद्गृहस्थावर उगाच इतक्या हिरीरीनें मी तुटून पडलों असें मला वाटलें.

आमच्या नाट्यमन्वंतर संस्थेला उद्देशून प्रो. फडक्यांनीं एकदां एका लेखांत ' इब्सेनचें एकही पुस्तक वाचल्याशिवाय, कांहीं लोक रंगभूमीवर मन्वंतर करावयाला उठले होते ' असा खोडकर उल्लेख केला होता. या उल्लेखाला 'चित्रें'तून उत्तर देतांना प्रो. फडक्यांवर मी निर्दयपणें हल्ला केला; आणि इब्सेनप्रमाणेंच क्रेटन हॅमिल्टनही लोकांनीं वाचला नसेल अशी प्रोफेसरसाहेबांनीं स्वतःची समजूत करून घेतल्यामुळें त्यांच्यावर कोणता प्रसंग ओढवला हें त्यांनीं विसरूं नये असें मीं त्यांना बजावलें. हें उत्तर लिहिल्यानंतर थोड्याच दिवसांनीं मी पुण्याला जात होतों. वाटेंत लोणावळा स्टेशनांत गाडी उभी राहिली तेव्हां चहा घ्यावयाला म्हणून मी प्लॅटफार्मवर उतरलों. समोर पहातों तों प्रो. फडके उभे. त्या वेळेला ते लोणावळ्यास रहावयाला आले होते. मनःपूर्वक हांसत त्यांनीं पुढें येऊन माझ्याशीं हस्तांदोलन केलें आणि म्हणाले, ' आम्ही तुम्हांला जरा कुठें चिमटा काढला तर तुम्ही आम्हांला अगदीं आरेबाहून काढलंत कीं ! '

‘ पण तो चिमटा तरी तुम्हीं अगदीं कांहीं एक कारण नसतांना कां काढलात ?’ मी म्हणालों.

या टीकेबाबत कडवटपणाचा एक शब्दही त्यांच्या तोंडून निघाला नाहीं. मी मनांत उमजलों, कीं हा केवळ ‘ साहित्यिक ’ नाहीं, हंसत चार देणारा आणि हंसतच चार घेणारा क्रिकेट, हॉकी, फूटबॉल खेळणारा हा एक ‘ माणूस ’ आहे. आम्हां ‘साहित्यिकां’त ‘ माणसें ’ किती थोडीं आहेत !

× × × ×

यानंतर आप्पासाहेबांशीं जेव्हां जेव्हां म्हणून बोलण्याचा प्रसंग आला तेव्हां तेव्हां त्यांच्या या ‘ माणुसकी’बद्दल माझा आदर अधिकच दुणावत गेला. अमेरिकन भाषेंत बोलायचें म्हणजे—He never talks ‘shop.’ Talking ‘shop’ म्हणजे जिथें तिथें, ऐकणाराला त्या बाबतींत जिज्ञासा असो वा नसो, आपल्या धंद्यासंबंधीं सारखें बोलत रहावयाचें ! आपण साहित्यिक ना; मग ऐकणारा डॉक्टर असो, वकील असो कीं विडीवाला असो, त्याला आपल्या आणि इतरांच्या साहित्यासंबंधीं सुनवावयाचें ! ऐकणाराला ज्या ज्या विषयांत कुतूहल असेल त्या त्या विषयावर बोलून, खरा माणूस त्याचें चित्त वेधून टाकीत असतो. अशीं ‘ माणसें ’ साहित्यिकांत म्हणा अगर दुसऱ्या कुठल्याही क्षेत्रांत म्हणा फारच थोडीं असतात. कवि म्हटला म्हणजे आपण कविता कशा केल्या आणि कुठें म्हणून दाखवल्या हें सदान्‌कदा सांगणारा. कम्युनिस्ट म्हटला कीं संप, क्रांति, कामगार आणि रशियावर उठल्या बसल्या व्याख्यान ऐकवणारा. रॉयसारखा एखादाच कम्युनिस्ट राजकारणाबरोबरच तत्त्वज्ञानावर, शास्त्रीय शोधांवर, काव्यावर, नाटकांवर, आइन्स्टीनच्या सिद्धांतांवर, तितक्याच तन्मयतेनें बोलून तुमचें चित्त हरूं शकतो. प्रो. फडके यांनीं वाङ्मयाची एक ओळही लिहिली नसती, तरीही ते मला मित्र म्हणून हवेसे वाटले असते. फडक्यांपेक्षांहि माझा ज्यांच्याशीं निकटचा स्नेह आहे असे दुसरे साहित्यिक म्हणजे अत्रे. अत्र्यांच्या वाङ्मयासंबंधीं कधींही मी त्यांच्याशीं बोललेला नाहीं; आणि तेही वाङ्मयासंबंधीं माझ्याशीं कधीं बोललेले मला आठवत नाहींत. पण अत्रे हाहि एक ‘ माणूस ’ आहे—चांगलाच भरभक्कम

' माणूस ' आहे; आणि त्याला तुम्ही जितका अधिक जवळून पहाल तितका तो तुम्हांला अधिक आवडूं लागेल.

* * * *

फडक्यांच्या बोलण्यांत, चालण्यांत, वागण्यांत, लिहिण्यांत एक प्रकारचा अवास्तव रेखीवपणा—कृत्रिमपणा दिसतो नाहीं ? असा प्रश्न मला पुष्कळांनीं विचारला आहे. गोष्ट खरी आहे. मलाहि तसा अनेक वेळां भास झाला आहे. पण त्याचें कारण मी शोधून काढलें आहे. बहुतेक सामान्य माणसें आणि त्यांतल्या त्यांत कलावंत वर्ग जें क्वचितच करूं शकतो तें फडक्यांनीं केलें आहे. त्यांनीं आपलें जीवन, लेखन, सर्व कांहीं संघटित (Organised) केलें आहे. अमक्या अमक्या वेळेला लिहावयाचेंच. पत्र लिहितांना अमक्या कागदावर अमक्या वळणाचें अक्षर काढूनच पत्र, लिहावयाचें; भाषण करतांना अशी सुरवात करावयाची, श्रोत्यांना अशा अशा रीतीनें विश्वासांत घ्यावयाचें आणि भाषणाचा असाच शेवट करावयाचा. आप्पासाहेबांच्या हातून जें इतकें विपुल लिखाण आणि भरदार कार्य होतें, त्याचें कारण हेंच. पण प्रयत्नांची शिकस्त करून असें संघटित आयुष्य कंठणें ही आम्हांला कृत्रिमता वाटते. कारण आमची सहजता म्हणजे वाटेल तेव्हां जेवायचें, वाटेल तेव्हां झोंपायचें आणि वाटेल तेव्हां घाईघाईनें खरडायचें. आमची सहजता याचा अर्थ सांवळा गोंधळ. फडक्यांच्या तथाकथित कृत्रिमतेचा मला हेवा वाटतो. अशीच खूपशी कृत्रिमता माझ्यांत येईल तर बरें होईल असें मला वाटतें ! मग, फडक्यांविषयीं तुम्हांस काय वाटतें ? या प्रश्नाचें उत्तर मी असें देईनः ' जंटलमन् ' या शब्दांतला सर्व भलाबुरा अर्थ जमेस धरून मी म्हणेन "He is first and last a gentleman."

# बुखारी : : ६

## यांच्या आयुष्यांतील एक दिवस

ऑल इंडिया रेडिओच्या बॅलार्ड पिअरवरल्या जुन्या कोंदट ऑफिसांत तुम्ही जर पूर्वी कधी गेलां असाल आणि स्टेशन-डायरेक्टर बुखारी यांची आणि तुमची गांठ पडली असेल, तर क्वीन्स रोडवरल्या त्यांच्या नव्या स्टुडिओंत गेल्याबरोबर पहिल्यादांच तुमची भेट झाल्याबरोबर ‘ Come, have you seen my new Studio ? ’ म्हणून मोठ्या हौसेनें तुम्हांला ते आपला नवा स्टुडिओ दाखवायला नेतील. नव्या स्टुडिओंतलीं एकाहून एक भव्य दालनें आणि आंतली डोळे दिपवून टाकणारी व्यवस्था पाहून तुमच्या तोंडांतून एखादा स्तुतीचा शब्द बाहेर आला पुरे, की झालेंच. श्री. बुखारी ताबडतोब तुम्हांला सांगतील: “ This is not only the best studio in India, it is the best in Asia ” त्यांच्या त्या म्हणण्यांत तथ्यही आहे. पण सरकारी इमारतीला ज्या अभिमानानें ते ‘ My Studio ’ म्हणतात, आणि त्याची थोरवी सांगतात त्याचें मात्र आपणांला कौतुक वाटतें. पण त्यांतच त्यांचें वैशिष्ट्य आहे. एखादी गोष्ट हातांत घेतली की तिचं त्यांना वेडच लागतें, याचा मला दोनतीनदां अनुभव आला आहे. नाटकें, संगीत यांचें त्यांना वेड आहे म्हटलें तरी चालेल, आणि त्यांच्या सुदैवानें ज्यांचें त्यांना वेड आहे त्या गोष्टी आपल्या मनाप्रमाणें हव्या तशा करून घेतां येतील, अशीच चांगली

लठ्ठ पगाराची नोकरी त्यांना मिळाली आहे.

इतरांना कंटाळवाणे पोटाचे उद्योग करून फावल्या वेळांत गांठचे पैसे खर्च करून आपलीं आवडतीं 'वेडें' पुरीं करावीं लागतात. बुखारीचें दैव असें बलवत्तर कीं, आपलीं 'वेडें' पुरीं करण्याबद्दल त्यांना आठशें–हजार रुपये पगाराची बडी सरकारी अंमलदाराची नोकरी मिळाली आहे!

रेडिओ स्टेशनच्या डायरेक्टरचें काम ते नोकरी म्हणून करीतच नाहींत, आवड म्हणून करतात. म्हणूनच इतक्या आपुलकीनें ते आपल्या नोकरीच्या जागेला 'my studio' म्हणतात. क्वीन्स रोडवरला हा भव्य स्टुडिओ बांधून झाल्यावर तो आंतून–बाहेरून शृंगारण्याचें सर्व काम आपण आपल्या अंगावर घेतलें होतें, ही गोष्ट बुखारी छाती पुढें काढून सांगतात. आंतले विजेचे दिवे कसल्या आकाराचे लावावयाचे; फर्निचर कसल्या डिझाइनचें आणावयाचें, सतरंज्या–गालिचे कसल्या रंगाचे घ्याव-याचे, सर्व कांहीं बुखारींनीं स्वतः केलें आहे. रेडिओ ऑफिसमधलें ते अत्याधुनिक पोलादी फर्निचर, चपराशांचे ते रंगीबेरंगी निळे डगले या सर्व बुखारींच्या 'कलाकृति' आहेत. मात्र त्यांना तोंडावर असें सांगण्या-ची सोय नाहीं. ताबडतोब घर कसें शृंगारावें, ह्या विषयावर ते तुम्हांला एक व्याख्यान सुनावतील! त्यांच्यापुढें बोलावयाला भीति वाटते ती एवढीच. जगांत असा एकही विषय नसेल कीं, जो बुखारींना गम्य नाहीं! तुम्ही कांहीं म्हणा, कीं तें बुखारींना माहीत आहे, इतकेंच नव्हे तर त्यांनीं तें केलें आहे.

त्यांच्याबरोबर सहज बोलतां बोलतां मी म्हणालों, "आमच्या मराठी रंगभूमीवर इब्सेन सांप्रदायाचीं आधुनिक नाटकें करण्याचा आम्हीं एक प्रयोग करून पाहिला होता, पण पैशाच्या दृष्टीनें तो अयशस्वी झाला. खर्चाच्या मानानें तुमच्या वास्तववादी आधुनिक नाटकांना हिंदुस्थानांत पैसे मिळत नाहींत."

"कोण म्हणतो आधुनिक नाटकाला खर्च फार येतो आणि पैसे मिळत नाहींत?" बुखारी म्हणाले, "मी शंभर रुपयांत एक संबंध नाटक

रंगभूमिवर आणूं शकतों. लाहोर, पेशावर येथें अशीं नाटकं मीं केलींही आहेत."

"काय, म्हणतां काय ?" मी उद्गारलों, "अहो, शंभर रुपये पात्रांच्या नुसत्या कपड्यांना पुरायचे नाहींत. त्याशिवाय देखावे, थिएटर-भाडें, नटांचे पगार इत्यादि खर्च आहेच."

"कपडे स्वतःचे घालायचे प्रत्येक नटानें," बुखारींचा ताबडतोब जबाब आला, "थिएटरखर्च हवा कशाला ?—एखाद्या हॉलमध्यें नाटक करायचं !"

"अहो, तरी पण—"

"तरी पण काय ?—मीं नाटकं केलीं आहेत, आणि शंभर रुपयांपेक्षां कमी खर्च आलाय् मला."

पुढें बोलण्यांत अर्थ नाहीं हें ओळखून तो विषय मीं सोडून दिला. सिनेमाची फिल्म कितीशें रुपयांत आपण काढूं शकाल, म्हणून मी त्यांना विचारणार होतों. इतक्यांत कुणीतरी त्यांना भेटायला आल्याची वर्दी शिपायानें आणून दिली. मी उठूं लागलों.

"बसा हो," मला आग्रह करीत ते म्हणाले; "असेल कुणीतरी; त्यांची लवकरच वासलात लावतों. बसा तुम्ही." माझ्याशीं गप्पा झोडण्याच्या ते रंगांत आले होते, आणि बऱ्याच गोष्टी मला ऐकवण्याचा त्यांचा विचार होता. कोण आले आहेत त्यांना आंत घेऊन ये, म्हणून शिपायाला त्यांनीं सांगितलें. थोड्याच वेळानें दोनतीन तरुण मुसलमान विद्यार्थी आंत आले. त्यांनीं अगदीं लवून मुसलमानी पद्धतीनें बुखारींना अभिवादन केलें. चेहऱ्यावर गोड हास्य आणून त्यांच्यापेक्षांही मोहक ऐटीनें मुसलमानी पद्धतीचीच सलामी बुखारींनी त्यांना दिली, आणि सफाईदार इंग्रजींत त्यांना समोरच्या कोचावर बसावयास सांगितलें.

"What can I do for you ?" ते मोठ्या आदबीनें म्हणाले.

एवढ्या मोठ्या स्टेशनडायरेक्टरची ती नम्रता किंवा नम्रतेचा तो अभिनय म्हणा,—पाहून ते विद्यार्थी बिचारे लाजल्यासारखेच झाले. ते हिंदुस्थानींतच बोलूं लागले. कमालपाशाची पुण्यतिथि किंवा

स्मृतिदिन कांहींतरी लवकरच येणार होता. त्या दिवशीं त्यांच्यापैकीं एकानें उर्दूत रचलेलें कमालपाशाचें स्तुतिस्तोत्र रेडिओवर त्यांना म्हणून दाखवावयाचें होतें. आणि म्हणून बुखारांपुढें आपली ही अभिनव कल्पना मांडावयाला ते विद्यार्थी आले होते. त्यांना वाटलें असेल, बुखारी मुसलमान आहेत. एका थोर, जगद्वंद्य मुसलमान विभूतीसंबंधीं बोलण्याचा कार्यक्रम आपणाला चुटकीसरसा मिळेल. मोठ्या उत्साहानें ते बुखारीकडे आले होते. त्यांचं म्हणणं ऐकल्यानंतर बुखारांनीं गंभीर चेहेरा केला आणि ते म्हणाले, " कमालपाशा हा एक थोर मुत्सद्दी होऊन गेला, हें मला मान्य आहे. एक थोर पुरुष म्हणून त्यांच्यापुढें मी जमिनीपर्यंत मान वांकवीन, पण आपल्या पवित्र मुसलमानी धर्माचा एक जाज्वल्य अभिमानी म्हणून केमालपाशाबद्दल मला मुळींच आदर वाटत नाहीं. ज्यानें खिलापतीची खिरापत केली, ज्यानें मुसलमानी बायकांच्या तोंडावरचा पडदा दूर केला—ज्यानें आपली आवडती उर्दू लिपि काढून पाश्चिमात्यांची रोमन लिपि तुर्की मुसलमानांच्या माथीं मारली त्याचा तुम्हांला अभिमान वाटतो ? तुम्ही सच्चे मुसलमान आहांत ना ? "

ते बिचारे मुसलमान विद्यार्थी हवालदिल होऊन म्हणाले, " हो ! "

बुखारींचा तो आवेश आणि तो अभिनय पाहून मला हसूं येत होतें. पण मी तें मोठ्या प्रयासानें आवरून धरलं. ते पुढें बोलूं लागले, " तुम्ही खरे मुसलमान आहांत ना ? झालं तर मग. एक थोर मुत्सद्दी म्हणून कमाल पाशाविषयीं आदर दाखवणं ठीक आहे. पण माझ्यासारख्या धर्मनिष्ठ मुसलमानाला तरुण मुसलमानांनीं कमालपाशाचीं स्तुतिस्तोत्रं गात फिरावं, हें मुळींच पसंत नाहीं ! आजकाल पहातों तों आमच्या मुसलमान तरुणांत धर्माविषयीं आस्थाच कमी होत चालली आहे ! "

हें सर्व भाषण इतक्या गंभीरपणाचा आव आणून बुखारी करीत होते, कीं ते तरुण विद्यार्थी सर्दच झाले !

" बरोबर आहे—तुमचं म्हणणं बरोबर आहे ! " असें म्हणत खोटेंच हास्य तोंडावर आणून त्यांनीं बुखारींचा निरोप घेतला. बुखारी त्यांना

दरवाजापर्यंत पोहोंचवावयाला गेले, आणि जातांना त्यांच्या पाठीवर हात फिरवून ते पुन्हा म्हणाले, " माझ्या तरुण मित्रांनो, मीं सांगितलेलं सर्व लक्षांत ठेवा हं ! "

दरवाजा बंद करून ते परत आल्याबरोबर मी मोठमोठ्यानें हसूं लागलों.

" हंसतां काय ? " आपला गंभीरपणाचा आव कायम ठेवून त्यांनीं मला विचारलें.

" नाहीं म्हटलं, तुमचं जाज्वल्य धर्मप्रेम पाहून मी स्तंभित झालों ! " मी म्हणालों.

" म्हणजे तुम्हांला खोट वाटतं कीं काय ? – खरोखरच एक मुसलमान म्हणून कमालबद्दल मला मुळींच आदर वाटत नाहीं ! "

" मि. बुखारी, " मी म्हणालों, "मला कांहीं कमालसाठीं रेडिओवर तुमच्याकडे कार्यक्रम मागायचा नाहीं ! "

" काय सांगावं–तुम्ही लोक आमच्यावर विश्वासच ठेवीत नाहीं ! " ते म्हणाले. बुखारी एक उत्कृष्ट नट आहेत, याबद्दल माझी खात्री झाली. मात्र त्यांना तसें सांगावयास मी धजलों नाहीं. कारण अभिनयकला, आणि आपण कोणकोणत्या नाटकांत काय काय कामें केलीं, याचा मनोरंजक इतिहास त्यांनीं मला सांगितला असता ! पण तो पुढें केव्हां तरी ऐकण्याची संधी मीं राखून ठेवली.

बुखारींविषयीं मला नेहमीं आश्चर्य वाटतें तें हेंच. ते नखशिखान्त कलावन्त आहेत, पण तितकेच धूर्त आहेत. कलावन्त सर्वसाधारणपणें अव्यवहारी आणि भाबडा असतो. पण इतर कलांच्या जोडीला विरोधकांच्या तोंडाला हंसत खेळत पानें पुसण्याची कलाही बुखारींनीं आत्मसात् केली आहे. त्यांचा तो टर्किश टॉवेलच्या कापडाचा हिरवा शर्ट, त्यावर तांबडा टाय, त्यावर अपटुडेट् काळा सूट आणि पायांत भरजरी पठाणी सॅंडल्स, हा चित्रविचित्र पोषाख या कलावन्ताचा आहे. पण स्टुडिओंत व्हाइसरॉय किंवा आगाखान यावयाचे असले, कीं कडक इस्तरीची कॉलर आणि

ड्रेससूट घालून ते तितक्याच सहजपणें फिरूं शकतात ! जितक्या शिताफीनें त्यांनीं त्या कमालपाशाच्या मुसलमान भक्तांना चकवलें तितक्याच शिताफीनें त्यांनीं एखाद्या कट्टया हिंदूलाही बनवला असता. राजा राममोहनरायविषयीं आपणाला रेडिओवर कांहीतरी बोलावयाचें आहे म्हणून सांगावयाला जर एखादा हिंदू तरुण आला असता, तर कर्मठ हिंदू तत्त्वांचें आवेशानें समर्थन करून जातिभेद, विधवाविवाहनिषेध इत्यादि पवित्र आणि सनातन हिंदु संस्थांचें उच्चाटन करून सर्वश्रेष्ठ हिंदु धर्माच्या पायालाच सुरुंग लावूं पहाणाऱ्या राममोहनरायांचें गुणगान तुम्ही कशाला रेडिओवर करतां, असें सांगून, त्या हिंदु तरुणाला त्यांनी वाटेला लावलें असतें ! आणि पुन्हां, मुसलमान असून बुखारीसाहेबांना हिंदुधर्माविषयीं केवढी ही कळकळ असें म्हणत तो घरीं गेला असता !

ते पहिल्यांदाच मुंबईत आले, आणि ‘ नमस्ते महाजनाः ’ ऐवजीं त्यांनीं ‘ आदाबे अरज ’ सुरू केलें, तेव्हां त्यांच्याविरुद्ध उठलेलें वादळ सर्वश्रुत आहे. जिथें तिथें उर्दू घुसडण्याची कडव्या मुसलमानांची ही वृत्ती आहे, असा आरोप त्यांच्यावर जिथून तिथून केला जात होता. त्या वेळीं या विषयावर त्यांच्याशीं बोलतांना मीहि त्यांच्या या नव्या उपद्व्यापाबद्दल त्यांची कानउघाडणी केली होती. पण ते अगदीं निरपराध गोगलगाईचा आव आणून शांतपणें म्हणाले, “ अहो, मी काय तुमच्यापेक्षां कमी राष्ट्रीय वृत्तीचा आहे असं तुम्हांला वाटतं कीं काय ? हिंदुस्थानांतल्या सर्व देशभक्तांप्रमाणें मलाहि या हिंदी उर्दू प्रश्नानें सतावून सोडलं आहे. आतां काय सांगूं तुम्हांला ? मला तीन मुली आहेत, त्यापैकीं एकीला हिंदी नांव दिलं आहे, दुसरीला उर्दू नांव दिलं आहे आणि तिसरीला अजून मी नांव मुद्दां ठेवलेलं नाहीं. मी सारखा निःपक्षपातीपणें विचार करतों आहे काय नांव तिला द्यावं तें ! ”

“ तुमच्या या भयंकर अडचणीबद्दल खरंच मला मनापासून सहानुभूति वाटते ! ” मी हंसत म्हणालों.

“ अहो, मला ‘ नमस्ते ’ काय आणि ‘ आदाबे अरज ’ काय—दोन्हीं

सारखींच ! " ते म्हणाले, " पण उत्तर हिंदुस्थानांतल्या बहुतेक रेडिओ स्टेशनांवर ' आदाबे अरज ' ची पद्धत आहे, आणि सर्व स्टेशनांवर एकच पद्धत असावी अशी हिंदुस्थानसरकारची सूचना आल्यामुळें मी इथें ' आदाबे अरज ' सुरू केलं–तों आपलं माझ्यावर लोकांनी विनाकारग काहूर उठवलं !– पण बाकी मला अशी कांहीतरी आरडाओरड झालेली पाहिजेच म्हणा ! "

हेंच त्यांचें शेवटचें वाक्य खरें होतें. खरोखर त्यांना उर्दूचा पुळका आला होता कीं काय कुणाला ठाऊक -मुसलमानी धर्माचा त्यांचा अभिमान किती कडवा आहे हें त्यांचे त्यांनांच माहीत. आतांपर्यंत अनेक डायरेक्टर आले असतील आणि गेले असतील, पण आपण मुंबईत आल्याबरोबर कांहीं तरी खळबळ उडवावी आणि सर्वांचें लक्ष आपणाकडे वेधलें जावें, हा एक त्यांचा मिस्किल हेतू होता खास. आणि तो भरपूर साध्य झाला. मला त्यांनीं किती तरी वेळ सांगितलें आहे, रेडिओवर असं कांही तरी बोला कीं दुसऱ्या दिवशीं तुम्हांला आम्हांला भरपूर शिव्या हांसडणारीं शेकडों पत्रं माझ्या टेबलावर येऊन पडलीं पाहिजेत ! "

आपल्या अस्तित्वाची जाणीव चोवीस तास लोकांच्या मनांत जळती ठेवण्याकरितां ते सारखे कांहींतरी नव्या नव्या कल्पनांचा विचार करीत असतात. बुखारींचें डोकें म्हणजे रंगीबेरंगी कल्पनांचा एक कारंजा आहे. बऱ्यावाईट, लहान मोठ्या, शक्य अशक्य, नाना प्रकारच्या नव्या कल्पना काळ्याकुट्ट केसांच्या दाट जंगलानें आच्छादलेल्या त्या अजब डोक्यांतून अष्टौप्रहर उसळत असतात. मात्र त्या ते सांगू लागले, कीं आपण त्या नुसत्या ऐकून घ्याव्या. त्यांच्या हाताखालची मंडळी या बाबतींत त्यांच्याशीं वादविवाद करीत नाहींत. कारण त्यांना आपल्या नोकऱ्या सांभाळायच्या आहेत; आणि निष्कारण उरस्फोड करतो कोण, म्हणून तिऱ्हाईत मनुष्य त्या भानगडींत पडत नाहीं. माझेच एक दोन अनुभव सांगतों. एकदां ते मला म्हणाले, "इब्सेनचा शतसांवत्सरिक कीं कसला तरी उत्सव लवकरच येतो आहे–तुझ्याकडे इब्सेनचं एक नाटक मराठींत केलेलें आहे ना ? तें आपण त्या दिवशीं रेडिओवर करूं या. "

मी म्हटलें, " ठीक आहे. "

बोलतां बोलतां इब्सेनचीं नाटकें मराठी रंगभूमीवर आणण्याच्या गोष्टी निघाल्या. माझ्या मराठी भाषांतरांतलीं इब्सेनच्या पात्रांचीं नांवें मराठी आणि वेषभूषाही मराठी हें पाहून ते म्हणाले, " हें काय ? मराठींतही नांवें मूळ युरोपियन आणि वेषही तसाच ठेवला पाहिजे. "

" अहो पण, " मी म्हणालों, " मराठी रंगभूमीवर आमच्या मराठी नटनटी झगे घालून आल्या आणि एकमेकांना 'काय नोरा, काय हेल्मर !' असं म्हणूं लागल्या, तर तें भयंकर हास्यास्पद होईल ! "

" कांहीं हास्यास्पद होत नाहीं. " अमर्याद आत्मविश्वासानें बुखारी म्हणाले, " मी उर्दू रंगभूमीवर असं अनेक वेळां करून पाह्यलं आहे ! "

" असं का ? " मी म्हणालों, " नशीब तुमचं ! आमचं नशीब तितकं बलवत्तर नाहीं ! "

रेडिओवर अगदीं छोटीं नाटकें करावीं, या विषयावर बोलतांना मी एकदां म्हणालों, " दहा किंवा पंधरा मिनिटांचीं तरी नाटकें पाहिजेत. "

" छत् ! " बुखारी म्हणाले, " एक मिनिटाचं नाटकसुद्धां करतां आलं पाहिजे. "

" अहो काय, बोलतां काय ? " मी उद्गारलों, " तुमच्या या एक मिनिटाच्या नाटकांत पात्रं किती आणि तीं बोलणार काय ? "

" बोलतील वाटेल तें, पण पात्रं हवीं तितकीं ! " ते म्हणाले. आतां मात्र मला अगदीं रहावेना. मी थोडा वेळ थांबलों, आणि गंभीरपणें म्हणालों, " कबूल कबूल. हवीं तितकीं पात्रं असलेलं एक मिनिटाचं नाटक मी रेडिओवर करून दाखवतों. मला एक कल्पना आली आहे. "

" काय ? " ते म्हणाले.

" होळी म्हणून आम्हां हिंदूंचा एक सण आहे. त्या दिवशीं आपण हें नाटक रेडिओवर करूं या ! "

" काय, काय ? " ते जिज्ञासेनें विचारूं लागले.

" शेंशंभर पात्रं उभीं करावयाचीं; आणि उलट्या केलेल्या मुठी

तोंडाला लावून एकच शब्द एक मिनिटभर त्यांना मायक्रोफोनपुढें ओरडायला सांगायचं ! ”

बोलण्याचालण्यांत, हंसण्यांत-खेळण्यांत बुखारी इतके नटत (acting) असतात, कीं ते मनापासून केव्हां बोलत आहेत, आणि नाटक केव्हां करीत आहेत, हें समजणें खरोखरच मुष्कील आहे. या मुलाखती-करतां म्हणून मी मुद्दाम त्यांना भेटायला गेलों होतों. आम्ही बोलत बसलों होतों, इतक्यांत मुंबईचे आर्चबिशप त्यांना भेटायला आले. त्यांना स्टुडीओ दाखवून थोड्याच वेळांत मी परत येतों म्हणून मला सांगून ते बाहेर गेले. तोंपर्यंत रेडिओ–ऑफिसमधल्या दुसऱ्या एका अधिकाऱ्याबरोबर मी गप्पा करीत असतां मला कळलें, कीं रविवार ता. ४ जून हा बुखारींचा पस्तीसावा वाढदिवस आहे.

“ अरेच्या ! ” मी म्हणालों, “ तर मग ही मुलाखत छापायची म्हणजे त्यांच्या वाढदिवसानिमित्त त्यांना मी एक बाक्षिसच देतों आहें म्हणायचा ! ”

कांहीं वेळानें बुखारी परत आल्यावर त्यांच्या खोलींत मी गेलों आणि म्हणालों, “ मला माहीतच नाहीं, येत्या रविवारीं तुमचा वाढ-दिवस आहे हें ! ”

“ कसला वाढदिवस घेऊन बसलां आहांत ! ” उदास चेहेरा करून, –उदासपणाचा अभिनय करून म्हणा, ते म्हणाले, “ वाढदिवसाची आठवण झाली कीं मला अगदीं खिन्न वाटतें ! ”

“ कां बुवा ? ” मी म्हणालों.

“ अहो, माझ्या सुंदर चेहेऱ्याखेरीज माझ्याकडे काय आहे ?–आणि जसजसे अधिकअधिक वाढदिवस येणार, तसतसा हा चेहेरा टाकाऊ होत जाणार ! ” एक दीर्घ निःश्वास टाकीत ते म्हणाले.

त्यांनीं खिन्नपणाचा अभिनय इतका बेमालूम केला, कीं माझ्या जागीं दुसरा कुणी असता तर त्यानें डोळ्यांतून टिपें गाळलीं असतीं !

# हुद्दार : : ७

## यांची मुलाखत

वेटरनें हातांत 'मेन्यूकार्ड' दिल्याबरोबर मी त्याच्यावरून नजर फिरविली आणि पाहुण्यांनाच विचारलें, " काय घेऊं या पहिला कोर्स ? "

" तुम्हांला वाटेल तो सांगा. "

" ठीक ", मी म्हणालों, आणि 'मेन्यूं'तला मला त्यांतल्या त्यांत चांगला वाटत असलेला ' कोर्स ' मीं निवडला. " इटॅलियन मटन विथ् मॅकारोनी" मी म्हणालों.

" माफ करा बुवा, त्याच्याखेरीज दुसरं काय वाटेल तें घेऊं. गेले सहा महिने फ्रँकोच्या कैदेंत इटॅलियन मॅकारोनी आणि 'बीन्स' खाऊन विटलोंय मी ! "

" अरेच्या ! मग आपण दुसरं कांहीं तरी घेऊं ! "

नुकतेच स्पेनच्या रणांगणावरून परत आलेले महाराष्ट्रीय वीर कॉ. हुद्दार यांच्याशीं मोकळेपणानें गप्पा करण्याकरितां म्हणून एका लहानशा, शांत ठिकाणीं मी त्यांना जेवायला घेऊन गेलों होतों; तिथेंच वरप्रमाणें आमचा प्रश्नोत्तरें झालीं. स्पॅनिश सरकारच्या बाजूनें इंटरनॅशनल ब्रिगेडमध्यें कॉ. हुद्दार लढावयाला गेले होते. नंतर ते फ्रँकोच्या सैन्याच्या हातीं सांपडले आणि नुकतेच तिथून सुटून मायदेशीं परत आले, वगैरे गोष्टी आतां सर्वांच्या परिचयाच्या झाल्या आहेत. आमच्या संभाषणांतला इटॅलियन

'मॅकारोनी'चा उल्लेख सहज आलेला असला तरी तो महत्त्वाचा आहे. जनरल फ्रँको स्वतःच्या पक्षाला स्पेनचा राष्ट्रीय पक्ष म्हणवतो, आणि स्पॅनिश सरकार हें आंतरराष्ट्रीय बोल्शेव्हिकांचें आहे असा त्यांच्यावर आरोप करतो. खरी वस्तुस्थिति अगदीं उलटी आहे. स्पॅनिश सरकार हें स्पॅनिश लोकांचें आहे. फ्रँको मात्र जर्मनी आणि इटलीचें बाहुलें आहे. फ्रँकोच्या सैन्याचे सर्व अंमलदार जर्मन किंवा इटॅलियन आहेत. खुद्द सैन्यांत तर लाखों इटालियन आणि हजारों जर्मन सैनिक आहेत. या गोष्टीचा उत्तम पुरावा म्हणजे हुद्दारांच्या बोलण्यांत वर आलेला मॅकारोनीचा उल्लेख. 'मॅकारोनी' हें इटालियन लोकांचें एक विशिष्ट खाद्य आहे. आपल्या इकडल्या गव्हाच्या शेवयासारखें तें असतें. फ्रँकोच्या कैद्यांनासुद्धां दररोज 'मॅकारोनी' चारण्यांत येत असे, यावरून बंडखोरांच्या मुलखांत इटालियनांचें केवढें प्रस्थ आहे, हें चांगलेंच दिसून येतें.

कॉ. हुद्दार यांची माझी ही दुसऱ्यांदा गांठ पडत होती. वर्ष—दीड-वर्षांपूर्वीं लंडनमध्यें त्यांची माझी भेट झाली होती, आणि आतां ही दुसऱ्यांदा. त्या वेळेला वृत्तपत्रव्यवसाय शिकावयाला इंग्लंडमध्यें असलेले ते एक विद्यार्थी होते; आज स्पेनच्या रणभूमीवर महाराष्ट्राचें आणि हिंदुस्थानचें नांव उज्वल करून आलेले ते एक शूर शिपाई आहेत. पण त्या वेळचे हुद्दार आणि आजचे हुद्दार यांत कांहींही फरक झालेला नाहीं. त्यांच्या दोन्ही भेटींनंतर त्यांच्यातला एक लोभनीय विशेष मला कांहीं आढळला असेल तर हाच, कीं अहंपणाचा अजिबात अभाव. प्रत्यक्ष युद्धावर जाऊन आलेल्या वीराच्या तोंडून ' युद्धस्य रम्या वार्ता ' ऐकण्याकरतां म्हणून परवां ब्राह्मणसभेच्या दिवाणखान्यांत जमलेल्या श्रोतृसमुदायाला त्यांनीं पहिल्याच सलीमाला पुढीलप्रमाणें थप्पड दिली.

" मी स्पेनमध्यें कसा गेलों; वाटेंत माझ्यावर काय काय रोमांचकारी प्रसंग आले; मी किती जणांशीं लढलों आणि कसा लढलों, या गोष्टी माझ्या माझ्याकडे. फार तर, माझ्या बायकोला, आईला किंवा मित्रांना वेळ जात नसला म्हणजे त्यांची करमणूक करण्याकरतां मी त्या सांगेन. जगाला

त्याचा कांहीं एक उपयोग नांहीं. आज स्पॅनिश युद्धाकडे आपण आत्म-निरपेक्ष ( objective ) दृष्टीनें पाहिलें पाहिजे. स्पेनमधला लढा हा केवळ स्पॅनिश लोकांचा नाहीं. सर्व जगाचें भवितव्य ज्याच्यावर टांगून राहिलें आहे, असा लोकशाही आणि फॅसिझम् यांच्यामधला जागतिक युगपरिवर्तनाचा हा लढा आज स्पेनच्या रणभूमीवर लढला जात आहे."

या ब्राह्मणसभेंतल्या व्याख्यानसंबधीं बोलतां बोलतां हुद्दार म्हणाले, " काय हो, खंदकांत आम्हांला स्त्रियाहि भेटावयाला येऊं लागल्या, असं मी बोलण्याच्या भरांत म्हणून गेलो, तेव्हां थोडा हंशा झाला नी गडबड उडाली. त्याबद्दल माझे मित्र मी असं बोलावयाला नको होतं असं म्हणाले."

" You did the best thing, " मी म्हणालों, " आणि नंतर तुम्ही श्रोत्यांना चापलंत तेंही अगदीं छान केलंत ! "

रशियाची मदत येण्यापूर्वी स्पॅनिश सरकारच्या सैन्याची कोण हलाखीची स्थिति होती याचें वर्णन हुद्दार ब्राह्मणसभेंतल्या त्या भाषणांत करीत होते. पुरेशा बंदुका नाहात, खंदकांत बसावयाची नीटशी सोय नाहीं, अशी सरकारी सैन्याची स्थिति होती. नंतर रशियाची मदत आली. खंदक सर्व सुखसोयींनी युक्त झाले, थंड—गरम पाण्याचे नळ खंदकांत खेळवले गेले, भरपूर अन्नपाणी मिळूं लागलें, " फार काय, स्त्रियांचीही आम्हांला भेट होऊं लागली. " स्त्रियांचा उल्लेख आल्याबरोबर लोक एकदम हंसले. तत्क्षणीं उसळून हुद्दार ओरडले, " हा Sex Complex नाहीं. तोफांच्या गोळ्यांनीं कानठळ्या बसत असतां आणि मशीनगनमधून डोक्यावर अग्निवर्षाव चालूं असतां मानवाच्या प्राथमिक भावना उत्तान झालेल्या असतात. खाणें, पिणें, स्त्रीसहवास या सामान्य माणसाला रोजच्या वाटणाऱ्या गोष्टींना ' सोल्जर ' च्या दृष्टीनें अवास्तव महत्व आलेलें असतें. स्त्रीचं नुसतं दर्शनच काय, पण स्त्रीचें चित्र पाहून आई, बहीण, पत्नीपासून ताटातूट झालेल्या सैनिकांचें सर्वांग थरारून जातं..." हे शब्द ते बोलले आणि श्रोतृसमुदायांत एकदम गंभीर शांतता पसरली.

" खरंच, आपल्या लोकांना कल्पना नाहीं. " हुद्दार मला म्हणाले,

"एखाद्या स्पॅनिश शिपायाची बहीण जर त्याला भेटावयाला खंदकांत आली, तर ताबडतोब तो तिची सर्वांशीं ओळख करून देई. स्त्री ही आम्हां सैनिकांना एक अमोल गोष्ट वाटे."

"काय वाटलं तुम्हांला स्पॅनिश स्त्रियांविषयीं? मी ज्या पाहिल्या त्या अगदीं आमच्या हिंदी स्त्रियांसारख्या मला वाटल्या." मी म्हणालों.

"अगदीं बरोबर. स्पॅनिश स्त्रिया, तुमच्या कोंकणच्या किनाऱ्यावरच्या स्त्रियांसारख्या मला वाटतात. धीट, पण भलताच फाजीलपणा कुणाला करूं देणार नाहींत!"

"रशिया, हिंदुस्थान आणि स्पेन या तीन देशांत आणि तिथल्या लोकांतही फार साम्य आहे, नाहीं? त्यांचा रंग, त्यांची भाषा, त्यांचे कपडे, त्यांच्या चालीरीती, बोलणं चालणं...," मी म्हणालों.

"कां हो, तुम्हांला रशियन लोक बावळट वाटले असं कुणीसं मला सांगत होता!"

"छे छे, बावळट म्हणजे काय?" मी म्हणालों, "इतर युरोपियन लोकांसारखे नव्हत,—आमच्यासारखे!"

"नाहीं हं. चुकतां तुम्ही." हुद्दार म्हणाले. "स्पेनमध्यें आम्हांला लष्करी शिक्षण देणारे शिक्षक व अंमलदार सर्व रशियन होते. मोठे हुषार वाटले मला बेटे!"

"आतां रशियासंबंधीं बोलतोंच आहोंत आपण, तर रशिया आणि स्पेनसंबंधींच्या एकदोन भानगडींचा निकाल लावून घेतों तुमच्याकडून. तुम्हीं प्रत्यक्षच सर्व कांहीं पाहिलं आहे. तेव्हां वृत्तपत्रांतल्या उलटसुलट बातम्यांपेक्षां तुमच्यावरच विश्वास ठेवलेला बरा. फ्रान्स आणि इंग्लंडच्या नादीं लागून रशियानें हवी होती तशी स्पेनला मदत केली नाहीं, असें कांहीं कम्युनिस्ट-विरोधी आणि ट्राट्स्कीस्ट म्हणतात त्यांत कितीसं तथ्य आहे?"

"अजिबात खोटी गोष्ट!" हुद्दार उद्गारले, "रशियाची मदत

नसती तर आज माद्रिद फ्रँकोची राजधानी झालं असतं! हां, हें मात्र खरं, कीं तटस्थता-समितींत (Non-intervention Committee) रशिया आपला डाव मोठ्या धूर्तपणें खेळत असे. जर्मनी–इटलीचे प्रतिनिधि म्हणाले, कीं आम्ही कांहीं युद्धसामुग्री फ्रँकोकडे पाठवीत नाही; कीं रशियाही म्हणे, ठीक, आम्हीही कांहीं पाठवणार नाहीं. पण जर्मनी–इटलीनें चोरून युद्धसामुग्री पाठवल्याचा पुरावा मिळाला कीं रशिया, आतां आम्हीं मदत पाठविणार म्हणून सांगूनसवरून स्पॅनिश सरकारला मदत पाठवीत असे!"

"मग स्पॅनिश कम्यूनिस्टांवरचे इतर आरोपही बहुतेक खोटेच असावेत" मी म्हणालों, "स्पॅनिश कम्यूनिस्ट पक्ष अत्यंत अल्पसंख्याक असतांना देखील मंत्रिमंडळांत पोलिसखात्याचा मंत्री कम्युनिस्ट असावा, असं दडपण आपल्या मदतीच्या जोरावर स्पॅनिश सरकारवर रशियानें आणलं, आणि नंतर कम्युनिस्टांनीं आपल्या विरोधकांचा–म्हणजे 'पूम्' (P. O. U. M.) वगैरे गटांचा छळवाद आरंभला, असं आम्ही बऱ्याच ठिकाणीं वाचतों."

"कम्युनिस्ट मंत्र्याकडे पोलिसखातं आहे हेंच मुळीं खरं नाही; डॉ. नेग्रीन यांच्या मंत्रिमंडळांत दोन कम्युनिस्ट आहेत हें खरं आहे. पण एकाकडे शेतकीखातं आहे आणि दुसऱ्याकडे शिक्षणखातं आहे."

"अस्सं!" मी म्हणालों. "मग 'पुम्'–'ट्रॉट्स्कीस्ट' लबाड, कीं कम्युनिस्ट?"

"तें कांहींही असो,' हुद्दार म्हणाले, "एक गोष्ट मात्र मी प्रत्यक्ष अनुभवावरून सांगतों. आमच्या सैन्यांत जिथें जिथें 'पूम' च्या तुकड्या असत, तिथें तिथें शत्रुपक्षाकडून आमच्यावर हल्ला झाला कीं माघार घेतली जात असे आणि कांहींतरी घोटाळा होत असे, हें मात्र निर्विवाद. 'पूम' च्या पुढाऱ्यांवर जे खटले झाले, त्यांचीं कांहीं पुस्तकें मीं आणलीं आहेत तीं वाचा तुम्ही पाहिजे तर. म्हणजे तुमची खात्री होईल.'

इतक्यांत 'वेटर' दुसरा 'कोर्स' काय पाहिजे म्हणून विचारावयाला

आला. इटालींतून एकदम मद्रासवर उडी मारून 'मेन्यू-' तला 'मद्रास करी अँड राईस' आणावयाला मी त्याला सांगितलें. आमचें बोलणेंसुद्धां इटली, स्पेन आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाकडून घरच्या राजकारणाकडे वळलें.

"कॉंग्रेसनें फेडरेशनचा जर स्वीकार केला, तर साम्राज्यशाहीविरुद्ध लढा चालवण्याची सर्व जबाबदारी आतां जहालांवर ( Leftists ) येऊन पडणार आहे," मी म्हणालों, "तुम्ही काय करणार? मला तरी किसान सभेच्या प्रचंड आंदोलनांत भविष्यकाळची थोडी तरी आशा दिसते."

"मी सुरवातीला तरी मध्यप्रांतांत किसान-संघटनेंचेच काम हातांत घेणार आहे," हुद्दार म्हणाले, "कॉंग्रेसमध्यें जमीनदार, सावकार, मजूर, मालक, शेतकरी यांचा एकच खुर्दा झाला आहे; त्याविरुद्ध तुमची टीका मला पटते." साम्राज्यशाहीविरुद्ध झगडण्याकरतां सर्व जहालांचा मिळून एखादा Democratic Popular Front चा गट असावा, असें जें तुम्ही म्हणतां त्याला माझा पूर्ण पाठिंबा आहे."

कॉफी पितां पितां त्यांच्या पीळदार देहाकडे आणि पाणीदार डोळ्याकडे पहात मी म्हणालों,

"फ्रँकोच्या तुरुंगांत फार हाल झाले तुमचे?"

"खरं बोलायचं म्हणजे नाहीं बुवा. ॲरॅगॉन फ्रंटवर पकडल्या गेलेल्या आमच्यासारख्या कैद्यांचे तरी फार हाल (Torture) झाले नाहींत."

"आणखी हिंदी इसम तुमच्याबरोबर कुणी होता का?"

"हो. अमेरिकेहून कर्नल जॉन्सन नावाचा एक लष्करी अंमलदार आमच्या इंटरनॅशनल ब्रिगेडमध्यें येऊन दाखला झाला. त्याच्याबरोबर कृष्णा नांवाचा एक हिंदी विद्यार्थी अमेरिकेहून आला होता. बिचारा स्पेनच्या रणांगणावर लोकशाहीसाठीं लढतां लढतां धारातीर्थी पडला. चोपेक नांवाचा एक झेक माणूस आमचा कमांडर होता.

घड्याळाकडे मीं पाहिलें तों बरेच वाजून गेले होते. कॉफी संपवून आम्ही जावयाला उठलों.

"स्पॅनिश भाषेंत आणि आपल्या मराठी भाषेंत भलतेंच साम्य आहे" हुद्दार उठतां उठतां म्हणाले. "तुमच्या 'कोळयाच्या गाण्या'-सारखीच एक स्पॅनिश कविता वाचलेली मला आठवते."

"अरेच्या!" माझ्या डोक्यांत एकच विचार आला, "वाङ्मयचोर कोण? मी कीं तो स्पॅनिश कवि?"

हुद्दारांना त्यांच्या हॉटेलांत सोडल्यानंतर घरीं येतांना मला सारखें वाटत होतें, "खरा मर्द आहे. या माणसाची खरी कामगिरी अजून पुढेंच दिसावयाची आहे!"

# शय्येवरले शेजवलकर ! :       :       ८

श्री. शेजवलकर यांच्या बुद्धिमत्तेबद्दल, अभ्यासू वृत्तीबद्दल आणि अप्रतिम लेखनशैलीबद्दल मला नेहमींच आदर वाटे. असा हा माणूस कांहीं खाजगी दुःखामुळें आणि मानसिक विकृतीमुळें गेलीं आठ–दहा वर्षें सर्व लेखनवाचन सोडून देऊन निष्क्रियतेंत काळ कंठीत शय्येवर पडला आहे, याची मला आणि प्रभाकर पाध्ये, हरिभाऊ मोटे यांच्यासारख्या माझ्या स्नेह्यांना नेहेमींच हळहळ वाटे. कांहींहि करून या माणसाला कोणी पुन्हां लिहावयाला लावील तर फार नामी गोष्ट होईल, असें आम्ही नेहमीं म्हणत असूं. श्री. शेजवलकरांना डेक्कन कॉलेजांत प्रोफेसर नेमल्याचें आम्हांला कळलें तेव्हां खरोखरच आम्हांला अतिशय आनंद झाला आणि मोटे यांनीं शेजवलकरांचे लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावयाचें ठरविलें, तेव्हां त्यांना मनःपूर्वक मीं धन्यवाद दिले याची साक्ष खुद्द हरिभाऊ मोटे देतील. हें पुस्तक मी अजून वाचलेलें नाहीं. पण 'प्रगतीं–' तल्या लेखांचें हें पुनर्मुद्रण असल्यामुळें त्यांतले बरेचसे लेख माझ्या नजरेखालून गेलेले असणार. मात्र या पुस्तकाची, आतां सर्वत्र चर्चेचा विषय होऊन बसलेली, 'शय्येवरून' ही शेजवलकरांची प्रस्तावना वाचून माझे बरेचसे समज चुकीचे होते याबद्दल माझी खात्री झाली. त्यांचे संकीर्ण त्रुटित लेख वाचून ते विचारी विद्वान् आहेत असें मला वाटत होतें, आणि त्यांच्या इतिहाससंशोधनासंबंधींची माहिती ऐकून ते मोठें इतिहाससंशोधक आहेत

अशी माझी कल्पना होती. ते विद्वान् असतील, पण इतिहाससंशोधन करण्याच्या त्यांच्या लायकीबद्दल मात्र मला जबरदस्त शंका उत्पन्न झाली आहे. इतिहाससंशोधन, तत्त्वज्ञान इत्यादि गहन विषय बहुतेक लोकांना समजत नाहींत, त्यामुळें या विषयांत लटपटी करणारा मनुष्य त्यांना उगाच मोठा विद्वान् संशोधक वाटतो. एक विद्वान् म्हणतो म्हणून दुसरा म्हणतो, दुसरा म्हणतो म्हणून तिसरा म्हणतो आणि अशा तऱ्हेनें कांहींच समजत नसल्यामुळें सर्वच एकाद्याला विद्वान् समजूं लागतात. शेजवलकरांच्या बाबतींत असाच प्रकार झालेला दिसतो. आपल्या प्रस्तावनेंत त्यांनीं आपलें तत्त्वज्ञान आणि व्यक्तिमत्व पुरेपूर स्पष्ट केलें आहे.

ही प्रस्तावना वाचून एका गोष्टीबद्दल बालंबाल खात्री होते. ती गोष्ट हीच की या माणसानें बाकी काय वाटेल तें करावें, पण इतिहासशास्त्र शिकवण्याला आणि इतिहाससंशोधन करावयाला हा माणूस अत्यंत नालायक आहे. या प्रस्तावनेवरून दोन गोष्टी निःसंदिग्धपणें सिद्ध होतात. एक, श्री. शेजवलकर हे धादांत खोटें बोलणारे, दांभिक इसम आहेत, आणि दोन, पुराव्याशिवाय विधानें करणें हा जवळ जवळ त्यांचा स्वभावधर्म झाला आहे.

मीं जीं हीं विधानें केलीं आहेत त्यांचे पुरावे आतां शेजवलकरांच्या प्रस्तावनेंतूनच काढून दाखवितों.

आपल्या प्रस्तावनेच्या पहिल्याच परिच्छेदांत श्री. शेजवलकर म्हणतात, कीं आतां वाचण्याची आपणाला बिलकूल इच्छा राहिलेली नाहीं; शेजारचा रेडिओ काय आपल्या कानावर बातम्या हाणतो तेवढेंच आपणाला कळतें. पहिलें असें कीं, घरांत रेडिओ असूनहि मनुष्य जर लक्षपूर्वक मुद्दाम बातम्या ऐकावयाला बसला नाहीं, तर त्याला रेडिओवर काय चाललें आहे तें कळण्याचा संभव नाहीं; तेव्हां शेजारचा रेडिओ शेजवळकरांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्या कानांत बातम्या हाणतो हें विधान धादांत खोटें आहे. चोरून किंवा उघडपणें बातम्या ऐकण्याची भयंकर कंडू असल्यामुळें शेजारचा रेडिओ लक्षपूर्वक ऐकत श्री. शेजवलकर बसत

असावेत, हें स्पष्ट आहे. दुसरी गोष्ट, वाचण्याची आपणाला बिलकूल इच्छा नाहीं हें विधान करतांना आपण मूर्तिमंत खोटेपणाचा अवतार आहोंत हें सांगायला शेजवलकर विसरले; कारण या प्रस्तावनेच्या तिसऱ्या परिच्छेदांत शेजवलकर प्रत्येक चालू साप्ताहिकाचा नि प्रत्येक दैनिकाचा स्तंभन् स्तंभ अथपासून इतिपर्यंत वाचतात, याचा भरपूर पुरावा आहे. सद्यःकालीन समाजावर शिव्याशापांचा वर्षाव करतांना शेजवलकर म्हणतात, "......त्या समाजाच्या गरजा भविष्यावर चालणारीं आणि भविष्यावांचून न चालणारीं, चिमटेचमत्काराची चमक दाखविणारीं व लाकडी ढलपे बोलके करणारीं, तो–ती–चा तोरणहार गुंफणारीं, झरोक्यांतून तिरंदाजी करणारीं, गवाक्षांतून कटाक्ष फेंकणारीं व रमण्यांत मोडखुर्दी वाटणारीं, थोडें गोड देऊन बहुत कडू करणारीं व वैतागवनांतून विषारी वाफारे सोडणारीं वृत्तपत्रें पुरवीतच आहेत... !"

या उताऱ्यावरून श्री. शेजवलकर धनुर्धारी, त्रिकाळ, चित्रा, विविधवृत्त, केसरी, प्रकाश हीं वृत्तपत्रें, त्यांतलीं जुनीं आणि नवीं सदरें तोंडपाठ म्हणून दाखविण्याइतक्या काळजीपूर्वक वाचतात हें सिद्ध होतें. 'धनुर्धारी'त भविष्य येतें आणि 'मोडखुर्दा' हें सदर धनुर्धारीत मागें चालू होतें हें सर्वांना माहीत आहे. 'बोलका ढलपा' व 'तो–ती' हीं 'चित्रें–' तलीं जुनीं–नवीं सदरें आहेत. 'झरोक्यांतून' हें 'विविध वृत्तां' तलें सदर विख्यात आहे. 'थोडे गोड थोडें कडू' या मथळ्याखालीं 'केसरीं' त मजकूर येतो. 'वैतागवनांतले वाफारे' ही लेखमाला मुंबईच्या 'प्रकाश' साप्ताहिकांत चालू होती. यावरून श्री. शेजवलकर हे चोरून रेडिओ ऐकतात त्याप्रमाणेंच चोरून सर्व कांहीं वाचतात, आणि आपण कांहींच वाचीत नाहीं असें निर्लज्जपणें विधान करतात हें उघड आहे. शेजवलकर यांना मी धादांत खोटें बोलणारा इसम आणि दांभिक म्हणतों तें यामुळेंच.

आतां पुराव्याशिवाय विधानें करण्याचा श्री. शेजवलकर यांचा स्वभाव पहा–"...इतिहासाच्या प्रोफेसरांना इतिहासमंडळांतील कार्यक्रमांना हजर राहण्यास वेळ मिळत नाहीं, पण ते अनंत काणेकरांच्या व्याख्याना-

साठीं दोन तास मोडूं शकतात !...या प्रकारांतील इंगित काय असावें? इंगित असें कीं खोटें नाणें खऱ्या नाण्याला बाजारांतून घालवून लावतें हा अर्थशास्त्रांतील चलनी नाण्याबद्दलचा सिद्धांत इतर क्षेत्रांतही खरा ठरत आहे!......" हें शेजवलकरांचें विधान घ्या. माझीं व्याख्यानें खरोखरच कवडी किंमतीचीं किंवा विचारशून्य असूं शकतील. माझ्या व्याख्यानांची चिकित्सा करून आणि त्यामधला पुरावा पुढें करून तीं खोटीं नाणीं आहेत असें एखाद्या टीकाकारानें सिध्द केलें; आणि अशा व्याख्यानासाठीं वेळ मोडून इतिहासमंडळां-तल्या भरीव कार्यक्रमाला तो विशिष्ट प्रोफेसर हजर राहिला नाहीं असें म्हटलें, तर त्या टीकाकाराचा सद्धेतु किंवा योग्यता याचा मी मुळींच संशय घेणार नाहीं. असल्या पुराव्यानें मला वैयक्तिक दुःख झालें तरी त्या टीकाकाराबद्दल मला आदरच वाटेल. पण जे शेजवलकर गेलीं कित्येक वर्षे कांहींच वाचीत नाहींत किंवा ऐकत नाहीत, ते माझें लिखाण किंवा व्याख्यान खोटें नाणें कसें ठरवतात? दुसऱ्याचें बरें न पहाण्याची क्षुद्र हेवेखोर वृत्ति आणि हलकट माणसाला साजेसा मत्सर एवढ्याच आधारावर शेजवलकर असलीं विधानें करतात असें मीं म्हटलें तर माझी चूक होईल काय? बेताल आणि पूर्वग्रहदूषित अशीं विधानें करण्याची संवय असल्यामुळें ज्याच्या इतिहाससंशोधनाला दीडदमडीचीही किंमत नाहीं, अशा एखाद्या शेजवलकरासारख्या इतिहाससंशोधकाचा कार्यक्रम इतिहास-मंडळांत असला, आणि त्याच वेळेला कांहींतरी विचार करूनच उच्चारलें जाणारें माझें व्याख्यान असलें, तर इतिहासमंडळाचा कार्यक्रम सोडून माझ्या व्याख्यानाला जाणारा प्रोफेसर फारतर शेजवलकरांना आवडणार नाहीं; पण प्रत्येक निरोगी आणि विचारी माणूस त्याला शहाणाच म्हणेल.

या प्रस्तावनेमध्यें आपलें तत्त्वज्ञान आणि व्यक्तिमत्व शेजवलकरांनीं स्पष्टपणें मांडलें आहे असें मीं सुरवातीलाच म्हटलें. त्यांच्या व्यक्तिमत्वाची पुरेशी चिरफाड मीं केली. आतां त्यांच्या जगाकडे पहाण्याच्या दृष्टिकोना-कडे वळतों. खोटीं नाणीं खऱ्या नाण्यांना बाजारांतून घालवून देतात. जगांत न्याय, निःस्पृहपणा, सत्यवादित्व यांना किंमत नाहीं. जाहिरातबाजी,

ढोलबडवेगिरी यांचीच जगांत चलती होते, वगैरे वगैरे प्रकारची टीका अनेक कंबरमोडक्या आणि ऊरबडव्या माणसांनीं अनादि कालापासून जगावर केली आहे. त्यांत ओजस्वी आणि सणसणीत भाषाशैलीखेरीज शेजवलकरांनीं कांही नवीन केलें आहे असें मला वाटत नाहीं. या टीकेंत बरेंचसें सत्यही आहे. पण तें एकांगी अर्धसत्य आहे. खोटीं नाणीं, दिखाऊ संस्था आणि दांभिक लोक यांचीच जगांत बहुसंख्या होती, आहे आणि असणार, हें खरें आहे. पण तेवढ्यामुळें जग मागें राहिलें किंवा मागें राहील, हें मात्र अजिबात खोटें आहे. हातावर मोजण्याइतकीं जी खरीं नाणीं, ज्या कार्यक्षम संस्था आणि जे सच्चरित लोक जगांत आहेत तेच या जगड्व्याळ खोटेपणाला धीरानें टक्कर देत जगाला पुढें नेत आले आहेत, आणि यापुढेंहि नेतील.

दांभिकाला तात्पुरतें यश मिळेल किंवा कांहीं थोडा वेळ खोटें नाणें खऱ्या नाण्याला बाजारांतून घालवील; पण अंतीं सच्चरिताचाच विजय होतो आणि शेवटीं खरें नाणेंच टिकून रहातें, असा इतिहासाचा निर्वाळा आहे आणि जगाचा अनुभव आहे. मात्र खऱ्या नाण्याला इतका आत्म-विश्वास आणि हिंमत पाहिजे.

आज जगांत भयंकर बजबजपुरी माजली आहे आणि जगाचे बारा वाजतात कीं काय अशी परिस्थिति आली आहे, ही गोष्ट त्रिवार सत्य आहे. पण त्याबरोबर हीही गोष्ट तितकीच खरी आहे कीं, नव्या सुंदरतर जगाचा जन्मकाल जवळ येऊन ठेपला आहे. अधर्माचें अभ्युत्थान होतें, साधूंची विटंबना होते आणि दुष्कृतांचा विजय होतो तेव्हांच धर्मसंस्था-पनेसाठीं, साधूंच्या परित्राणासाठीं आणि दुष्कृतांच्या विनाशासाठीं भग-वंताचा अवतार होतो आणि तो नवें जग निर्माण करतो असें गीतेंत सांगितलें आहे. ही झाली जुनी भाषा. स्वतःला भौतिकवादी म्हणविणारे आम्ही नवे लोक हीच गोष्ट निराळ्या भाषेंत सांगतों. जुन्या जगाच्या पोटांतूनच नव्या जगाची उत्पत्ति होते. आज जुन्या जगाला नव्या जगाच्या जन्माच्या वेळच्या प्रसूतिवेदना लागल्या आहेत. जुन्या जगाचा चेहेरा वेडाविद्रा, काळवंडलेला आणि भयंकर दिसतो, त्याचें कारण या असह्य

वेदनाच होत. हें दृश्य जितकें निराशाजनक आणि भयदायी आहे, तितकीच आतां या भयंकर प्रसंगांतून नव्या सुंदरतर जगाचा जन्म होणार आहे ही गोष्ट रमणीय आणि आशादायक आहे. आम्हांलाही शेजवलकराप्रमाणेंच जगाची ही भयंकर बाजू दिसते. पण शेजवलकरांना कधींच अनुभवावी लागलीं नसतील अशा अनंत खासगी दुःखांना पोटांत पचवून, ताठ पायावर छाती पुढें काढून आम्ही उभें आहोंत; त्यामुळें जगाची चांगली, आशादायक बाजूही आम्हांला दिसते.

एका दुःखाच्या घाल्यानें शेजवलकर शय्येवर पडले ते पडलेच. शय्येवर पडून जगाकडे पहात असल्यामुळें चालत्या बोलत्या जगाचा दिसूं नये तो आणि पाहूं नये असा अवाच्य भागच त्यांना दिसतो. त्यांत जगाचा किंवा इतरांचा काय दोष ?

मात्र या सर्व धकाधकींत शेजवलकरांनीं जी एक कला साधली, ती आम्हांला कधींच साधली नाहीं किंवा साधण्याचा आम्हीं प्रयत्नही केला नाहीं. आपल्या दुर्दैवाचा आणि आपल्यावर कोसळलेल्या दुःखाचा शेजवलकरांनीं मोठ्या कुशलतेनें आणि शिताफीनें उपयोग केला. आपल्या दुर्दैवाची कहाणी भडक रंगांत आणि मोठ्या हृदयद्रावक रीतीनें सांगून आपल्या भाऊबंदांच्या आणि स्नेह्यासोबत्यांच्या हृदयाला त्यांनीं अचूक पाझर फोडला आणि आमच्यासारखे लोक कुठें कोर्टांत रखड, तर कुठें वर्तमानपत्रांच्या कचेरींत अपुऱ्या पगारावर दिवस काढ, असा कांहींना कांहीं तरी उद्योग करून स्वतःचें आणि स्वतःच्या माणसांचें पोट भरीत असतां, शेजवलकर खुशाल शय्येवर पडून गेलीं सात आठ वर्षें काढी. मात्र उद्योग न करतां भाऊबंदांच्या किंवा स्नेह्यासोबत्यांच्या जिवावर चरून स्वतःचें शरीर पोसूं शकले, हरिभाऊ मोट्यांसारखा श्रीमन्त आणि रसिक प्रकाशक गांठूं शकले, आणि शेवटीं मोठमोठ्या लोकांच्या काळजाला घरे पाडून डेक्कन कॉलेजांतली इतिहासाच्या प्रोफेसराची सुखासीन जागा पटकावूं शकले. खरंच, किती कृतघ्न हा महाराष्ट्र !

शेजवलकरांच्या अर्थशास्त्राच्या, समाजशास्त्राच्या आणि राजकारणशा-

स्त्राच्या स्वयंमन्य अगाध ज्ञानाचा आतां समाचार घेऊं. शेजवलकर या प्रस्तावनेंत म्हणतात,

"......तोफा, विमानें, मोटार, आगगाड्या राहोत, पण साध्या सुयाटांचण्या वा चाकू–चमचे सुद्धां ज्यांना करतां येत नाहींत त्यांनी स्वराज्याच्या बाता झोकणें किती शहाणपणाचें आहे...

......मग ज्यांचें स्वातंत्र्य आधींच नष्ट झालेलें आहे, त्यांना आधी आर्थिक, औद्योगिक व सामाजिक पुनर्घटना घडवून आणल्याशिवाय स्वातंत्र्याची व स्वराज्याची वार्ताच कशाला?... "

हिंदुस्थान स्वतंत्र नाहीं, म्हणून हिंदुस्थानचें औद्योगीकरण होऊं शकत नाही,—परकीय सरकार आपल्या देशांतल्या उद्योगधंद्यांना हिंदुस्थानांतल्या उद्योगधंद्यांची स्पर्धा नको म्हणून आपली सर्व सत्ता एकवटून हिंदी उद्योगधंद्यांच्या गळ्याला नख लावतें किंवा नवे उद्योगधंदे काढूं देत नाहीं, ही गोष्ट महशूर आणि निर्विवाद आहे. राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यावरच हिंदुस्थान स्वतःचे उद्योगधंदे वाढवूं शकेल किंवा सामाजिक पुनर्घटना करूं शकेल ही गोष्ट लोकमान्य टिळकांपासून तों महात्मा गांधीपर्यंत सर्व जहाल पुढाऱ्यांना, गोखल्यांपासून तों सर एच्. पी. मोदीपर्यंत सर्व मवाळाग्रणींना आणि या सर्वांना इतर बाबतींत विरोध करणाऱ्या कम्युनिस्टांनाही मान्य आहे. जहाल, मवाळ, क्रांतिकारक अशा सर्व विचारवंतांचें आणि कार्यकर्त्यांचें या बाबतींत एकमत आहे. आमचे शय्येवरले शेजवलकर मात्र स्वातंत्र्याच्या किंवा स्वराज्याच्या बाता न करतां, आम्हांला तोफाविमानांचे आणि मोटार आगगाड्यांचे कारखाने काढायला सांगत आहेत. ते कसे, कुठें आणि कुणी काढावयाचे हें मात्र ते सांगत नाहींत. ही शेजवलकरांची राजकीय विद्वत्ता.

हीच गत 'प्रगती,' 'प्रतिभा' बंद पडतात आणि मोतिरामशेट रांगणेकर एकामागून एक अनेक साप्ताहिकें काढूं शकतात, या शेजवलकरांच्या करुण किंकाळीची. परिस्थितीची शांतपणें आणि निःपक्षपातीपणें छाननी करून सिद्धांत काढण्याची या गृहस्थाच्या मेंदूंत कुवतच नाहीं.

क्षणभर वादाकरतां धरून चालूं कीं, शिराळशेट शेजवलकरांचीं 'प्रगती,' 'प्रतिभा' वगैरे पत्रें सखोल व भरीव होतीं; आणि मोतीरामशेट रांगणेकरांचीं पत्रें अखोल आणि उथळ आहेत. पण मोतीरामशेटना एकामागून एक, एक सोडून दुसरें पत्र काढावें लागलें, हें कांहीं त्यांचें यश नव्हे. म्हणजेच याचा अर्थ सखोल पत्रेंहि बुडालीं आणि अखोल पत्रेंहि बुडतात. शेजवलकरांच्या समाधानाकरतां कांहीं अखोल, टवाळखोर पत्रें चांगलीं चाललीं आहेत हें खरें मानलें, तरी पण 'केसरी' 'महाराष्ट्र' यासारखीं भारदस्त, सखोल पत्रेंही चांगलीं लाखो रुपयांची माया करून भरभराटींत चाललीं आहेत. या सर्व गोष्टींवरून सिद्धान्त हाच काढावयाचा कीं, पत्रांच्या बुडण्याचें कारण महाराष्ट्राला अखोल पत्रें हवींत आणि सखोल नकोत, वा सखोल हवींत नी अखोल नकोत असें नाहीं, तर महाराष्ट्राची आर्थिक असहाय्यता किंवा देशांतली राजकीय परिस्थिति हें आहे.

'प्रगती' बंद पडावयाचें कारण सरकारनें जामीनकीचा हुकुम 'प्रगती-' वर बजावला हें आहे. हें राजकीय कारण झालें. 'प्रगतीं-' त सखोल लिखाण येत होतें, म्हणून महाराष्ट्रानें 'प्रगती-' वर बहिष्कार घातला किंवा शेजवलकरांचें सुंदर लिखाण 'प्रगती' चे मालक मंगेशराव कुलकर्णी यांना बघवेना म्हणून त्यांनीं 'प्रगती' बंद केली असें मुळींच नाहीं.

'प्रतिभा' कां तोट्यांत आली हें हरिभाऊ मोटेच सांगतील. जाहिराती मिळवण्याच्या व्यावहारिक बाजूंची हरिभाऊंनीं उपेक्षा केली. आम्ही त्यांना कित्येक वेळां सांगितलें असतां ते स्पष्ट म्हणत "कोण करतो जाहिरातीसाठीं यातायात! आपणाला तें कांहीं जमत नाहीं." पण हरिभाऊ मोटे महाराष्ट्राच्या नांवानें कानशिलावर बोटें मोडीत बसले नाहींत. ते खेळाडू वृत्तीनें नेहेमीं म्हणतात, कीं 'शक्य तोंपर्यंत एक चांगली गोष्ट आपण केली; पुढें सोडून दिली.' आणि महाराष्ट्रानें चांगल्या माणसाला मदत केली नाहीं असें थोडेंच आहे? टिळकांना

महाराष्ट्रानें पैसे दिले. कालपरवां ' त्रिकाळ-' कारांना थोड्याच वेळांत तीन हजार रुपये महाराष्ट्रीय जनतेनेंच मिळवून दिले-

मात्र रणांगणांत उडी घालणाऱ्या हिंमतवान् मर्दाला महाराष्ट्र मदत करतो, शय्येवर विवळणाऱ्या शिळपटाला करीत नाहीं, हा महाराष्ट्राचा घोर अपराध मी कबूल करतों.

माझें म्हणणें संपलें. शेजवलकरांवर मी वैयक्तिक हल्ला चढवला असें कांहीं लोक म्हणतील. मला अगदी कबूल, कीं हा वैयक्तिक हल्ला आहे. पण असला हल्ला करण्याचा हक्क मला शेजवलकरांनींच प्राप्त करून दिला. शेजवलकरांचें मी कधींच मनानें वाईट चिंतिलें नव्हतें. कीं कृतीनें कधीं चुकून सुद्धां त्यांचें वाईट करण्याचा प्रयत्न केला नव्हता, तरीही त्यांनीं विनाकारण माझ्यावर नांव घेऊन वैयक्तिक हल्ला चढवला. तो हल्ल तितक्याच जोरानें मी परतविला हा केवळ न्यायच झाला. दुसरें असें, की, तसें पाहूं गेल्यास हा वैयक्तिक हल्लाच नव्हे; कारण शेजवलकरच म्हणतात कीं ते आणि जग यांत मुळी फरकच नाहीं—त्यांचें सुख तें जगाचें सुख आणि त्यांचा ऱ्हास तो जगाचा ऱ्हास. अर्थात् माझी टीका म्हणजे कुणाही व्यक्तीवरची टीका न होतां जगावरचीच टीका झाली. आणि पुन्हां दांभिक, असत्यवादी हे शिव्याशापासारखे दिसणारे शब्द मीं वापरले ते शिव्याशाप होऊंच शकत नाहीं. कारण पुरावा देऊन नंतर मी ते वापरले. म्हणजे त्या शिव्या नसून तें यथार्थ वर्णन होय. बाबू चष्मेवाल्याला किंवा तंट्या भिल्लाला दरवडेखोर म्हणणें ही कांहीं शिवी नव्हे—तें सत्यकथन.

मात्र शेवटीं शेजवलकरांना मी त्यांच्याच शब्दात सांगतों कीं, ' वर एवढें जें संकीर्तन केलें तें अत्यंत दुःखित मनानें, मोठ्या कष्टानें केलें. माझे शब्द क्वचित कडक वाटतील पण माझें मन मी बालकाप्रमाणें स्वच्छ ठेवलें आहे. ज्यांच्यावर माझी टीका असते त्यांचेहि गुण माझ्या दृष्टिआड नाहींत. ' आपण जिवंत असून मेल्यासारखेच आहोंत असें सुरवातीलाच श्री. शेजवलकर म्हणतात. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो !

## ‘ ज्वाला ’ : : ९

श्री. माधव मनोहर यांची पहिलीच कादंबरी ‘ ज्वाला ’ मी नुकतीच वाचून काढली. एक सडेतोड आणि मर्मभेदक टीकाकार म्हणून श्री. माधव मनोहर यांचा अलिकडे बराच बोलबाला झाला आहे. या कारणा-मुळें म्हणा किंवा माधव मनोहर यांचे आणि माझे वैयक्तिक संबंध स्नेहाचे आहेत म्हणून म्हणा, ही कादंबरी नेहमींपेक्षां कितीतरी अधिक उत्सुकतेनें आणि अधिक काळजीपूर्वक मी वाचली. ती वाचल्यानंतर माझें असें ठाम मत झालें, कीं त्यांनीं ही कादंबरी प्रसिद्ध करावयाला नको होती. माधव मनोहर हे माझे स्नेही असल्यामुळें तर तसें फारच वाटलें. त्यांनीं ती लिहावयालाच नको होती असें मी म्हणत नाहीं. पुढें प्रतिभासंपन्न म्हणून प्रसिद्ध झालेले मोठमोठे लेखकसुद्धां असें कांहीं तरी आपल्या तरुण वयांत लिहितात, पण बहुधा तें ते प्रसिद्ध करीत नाहींत; निदान चांगला लेखक म्हणून नांव कमावल्यावर तरी कोंवळ्या वयांत लिहिलेलें आपलें उथळ लिखाण प्रसिद्ध करण्याच्या भानगडींत ते पडत नाहींत. माधव मनोहरानीं मोठी चूक केली ती हीच. मराठी आणि इंग्रजी वाङ्मयाचे रसिक तज्ज्ञ आणि कुणाचाही मुलाहिजा न ठेवतां मोठमोठ्या लेखकांचे गुणदोष निर्भीडपणें वेशीवर टांगणारे टीकाकार म्हणून श्री. माधव मनोहर यांनीं नांव केलें; आणि शेवटीं या परिणतप्रज्ञ माधव मनोहरांनीं एका ‘ दुबळ्या, निष्क्रिय, भावनाशील ’ म्हणजेच एका उथळ, अर्ध्याकच्च्या, माधव मनोहर नांवाच्या

( सुदैवानें दिवंगत झालेल्या ) लेखकाची ' ज्वाला ' ही कादंबरी प्रसिद्ध केली ! या चुकीचें प्रायश्चित्त त्यांना आतां निमूटपणें भोगायला हवें.

स्वतः माधव मनोहरच आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं, " ...... ' ज्वालें ' त क्रांतिकारक, युगप्रवर्तक, प्रक्षोभक किंवा पुरोगामी असें कांहीं आहे, असें मुळींच नाहीं. या कथेंत नवमतवाद नाहीं, साम्यवाद नाहीं, फार काय साधा ध्येयवादसुद्धां येथें नाहीं. भांडवलवाला आणि श्रमजीवि हे शद्बसुद्धां या कथेंत कुठें आलेले नाहींत. पददलितांच्या असह्य अपेष्टांची हृदयद्रावक भडक वर्णनें येथें मुळींच नाहींत. राजकारणाची आकर्षक पार्श्वभूमीही या कथेला लाभलेली नाहीं...... या कथेंत आहे तरी काय ? ही......एक प्रेम ( भंग ) कथा आहे...... ' ज्वाला '—ही माझ्या या मित्रानें लिहिलेली एक मनोज्ञ कथा आहे......" या पांचपन्नास गोष्टी या कादंबरींत नाहींत यांत कांहींच नवल नाहीं. स्वतःच्या अंतरंगांत, दिवास्वप्नांत आणि ग्रंथसृष्टींत सदासर्वदा रंगलेल्या एका दुबळ्या निष्क्रिय युवकाला क्रांती, युगप्रवर्तन, पुरोगामित्व, साम्यवाद इत्यादि गहन गोष्टी समजणार काय, आणि आपणाला समजल्या असें वाटलें तरी कादंबरीसारख्या कलाकृतींत कलात्मक रीत्या तो आणूं शकणार काय ? फार तर आपल्या कलाकृतींत या शब्दांची तो जोरदार पोपटपंची करील. आणि तशी त्यानें केलीच आहे. पान १०० पहा. ( " ......साम्यवादाचे ते सच्चे, समरधुरंदर सेनानी तिकडे बिनीवर झुंज घेत आहेत......लाल बावट्याचे ते शूर इमानदार शिपाई आठवले कीं लज्जेनें मी अर्धमेला होऊन जातों..." ) वगैरे वगैरे. म्हणजे या कादंबरींत साम्यवाद, भांडवलशाही, राजकारण इत्यादि भानगडी नाहींत असें माधव मनोहर म्हणतात तेंही तितकेंसें खरें नाहीं. त्या आहेत, पण कलात्मक स्वरूपांत नसून अचरट बडबडीच्या स्वरूपांत आहेत.

बरें, या गहन गोष्टी जाऊं द्या. पण तिन्ही त्रिकाळ स्वतःच्या भावना-कल्पनांतच गुंगून गेलेला आणि माणसांच्या जगाकडे ज्याची दृष्टीही वळलेली नाहीं असा एक आजिबात अननुभवी माणूस प्रेमासारख्या,

माणसाच्या आयुष्यांतल्या अत्यंत महत्वपूर्ण अशा भावनेवर, प्रसिद्ध करण्याच्या लायकीची मराठी कादंबरी लिहूं शकेल, असं माधव मनोहरांसारख्या सुज्ञ आणि मर्मज्ञ टीकाकाराला वाटलें तरी कसें ? या अननुभवी, नवथर माणसाच्या कादंबरीत साम्यवाद, लाल क्रांति, पुरोगामित्व इत्यादि गोष्टी नाहींतच; पण जी प्रेमकथा आहे तीही वाङ्मयदृष्टया अगदीं सामान्य आणि ठराविक आहे असें माधव मनोहर म्हणूं शकले असते. त्यांनीं असें म्हटलें असतें, कीं वादच मिटला असता. मग आमच्यासारख्या मित्रांनीं त्यावर एकच प्रश्न विचारला असता कीं, ' असें जर आहे, तर ही प्रेमकथा छापून प्रसिद्ध करण्याच्या भानगडींत तूं पडलास कशाला, बाबा ? ' आणि ' मित्रप्रेमानें आपण असें केलें; ' असें कांहींतरी उत्तर देऊन माधव मनोहर त्यांतून सुटून जाऊं शकले असते. पण खरी गंमत अशी आहे कीं, माधव मनोहरांना तसें वाटत नाहीं. त्यांना ही एक ' मनोज्ञ ' प्रेमकथा वाटते. या कादंबरीत क्रांति नाहीं, साम्यवाद नाहीं, पुरोगामित्व नाहीं, असें ते म्हणतात, तेव्हां त्यांना आपल्या दिवंगत मित्राच्या कृतीवर मर्मभेदक टीका करावयाची नसून हीं नांवें घेऊन आपल्या कादंबऱ्या अद्यावत् आणि श्रेष्ठ दर्जाच्या आहेत असें भासवूं पहाणाऱ्या नव्याजुन्या प्रथितयश मराठी लेखकांना चिमटा घ्यावयाचा आहे, असें मला वाटतें. आपल्या या दुबळ्या, निष्क्रिय, उथळ, अननुभवी लेखकमित्राबद्दल त्यांना चोरटी सहानुभूति वाटते. त्यानें लिहिलेल्या या कादंबरींत उपरोक्त बड्या बड्या गोष्टी नसतील, पण ती एक उत्कृष्ट विशिष्ट वाङ्मयीन दर्जा असलेली, प्रसिद्ध करण्यालायक प्रेमकथा आहे, याची त्यांना खात्री आहे.

ही कथा लिहिणाऱ्या लेखकाची माधव मनोहर यांनीं प्रस्तावनेंत जी बरीचशी माहिती दिली आहे, ती जर खरी असेल, तर हा गृहस्थ भरदार अर्थपूर्ण अशी प्रेमकथा लिहूंच शकणार नाहीं, हें उघड आहे. अर्थात् त्यांत त्याचा कांहींच अपराध नाहीं. माणसांच्या जगाची ओळख नसलेला, पुस्तकें वाचून पिसाळलेला असा तो अल्लड, अननुभवी तरुण आहे. याला तो तरी काय करणार ? प्रेमासारख्या महाकठीण विषयावर आपण

छानदार गोष्ट किंवा उत्कृष्ट कादंबरी लिहूं शकूं, असें त्याला वाटलें; आणि एक कादंबरी त्यानें लिहून टाकली. ती तशीच पडून राहिली असती तर आमचें कांहींच म्हणणें नव्हतें. पण माधव मनोहरांनीं ती प्रसिद्ध करून आमच्यापुढें ठेवली आहे. तेव्हां तिची चिरफाड करणें आमचें कर्तव्यच आहे.

‘ज्वाले’चें कथानक अगदीं साधें आहे. प्रभा नांवाच्या एका माणसाचें निनीनामक मुलीवर फार प्रेम असतें. ती हेमा नांवाच्या दुसऱ्या एका तरुणाशीं विवाहबद्ध होते. प्रभा भग्नहृदय होतो आणि मरेपर्यंत नाना-तऱ्हांनीं निनीचें चिंतन करीत एका एकांत जागीं जीवन व्यतीत करतो. पण तें जीवन मात्र एकलकोंडें नसतें. उषा नांवाची त्याची बायको आहे. त्याशिवाय घरांतली तरुण मोलकरीण जाई, त्याच्यावर आषक्त आहेच. शेवटीं जाईचा नवरा फकिरा प्रभाचा खून करतो आणि या प्रेमकथेचा अंत होतो.

कथानक हें असें साधें किंवा सामान्य आहे, हा मात्र मी मुळींच दोष समजत नाहीं. जगांतल्या वाङ्मयांतल्या कुठल्याही उत्कृष्ट प्रेमकथेंत किंवा प्रेमकाव्यांत असलेंच किंवा अशासारखेंच कथानक असतें. कुठ-ल्याही वाङ्मयकृतीचें मूल्यमापन करावयाचें तें लेखकानें विषय काय निवडला आहे यावरून करावयाचें नाहीं. विषय अनेक लेखकांचा एकच असूं शकतो,—नव्हे असतो. त्यानें तो विषय कसा हाताळला आहे, त्यांत त्याचें वैशिष्ट्य किंवा त्याच्या प्रतिभेचा ‘ नवोन्मेष ’ काय आहे यावरून त्या वाङ्मयकृतीचें महत्व किंवा दर्जा ठरवावयाचा असतो. प्रेमकाव्य शेलेनें लिहिलें आहे, कीट्सनें लिहिलें आहे, रूपर्ट ब्रुकनें लिहिलें आहे. पण प्रेम या भावनेवर प्रत्येकानें कांहीं तरी नवा प्रकाश पाडला आहे. आणि म्हणूनच त्यांच्यापैकीं प्रत्येक जण मोठा कवि आहे. शेले किंवा कीट्सच्याच कल्पना थोड्याशा निराळ्या भाषेंत रूपर्ट ब्रुकनें पुढें मांडल्या असत्या तर तो एक दशम दर्जाचा कवि म्हणून ओळखला गेला असता. पण प्रेमावर आपण आतांपर्यंत इतकीं काव्यें वाचलीं त्यापेक्षां कांहीं-

तरी नवीन आपणाला आज वाचावयाला मिळालें, आतांपर्यंत आपणाला आलेल्या जीवनानुभवांत कांहींतरी नवीन अनुभवाची भर पडली असें रूपर्ट ब्रुक वाचल्यानंतर वाचकाला वाटतें. हीच वाङ्मयाची किंवा कुठल्याही कलाकृतीची खरी कसोटी. व्हेनिस बंदरांतला सायंकाळ पुष्कळांनीं पुष्कळ वेळां पाहिला असेल. टर्नरचें 'व्हेनिस येथील सायंकाळ' हें चित्र पाहिल्यानंतर तुम्ही जर तोच सायंकाळ पुन्हा पहाल तर त्यांत तुम्ही पूर्वी कधींही न पाहिलेलें कांहीं तरी अपूर्व सौंदर्य तुम्हांला दिसेल. एखादा मोठा शास्त्रज्ञ ज्याप्रमाणें मनुष्यजातीच्या ज्ञानसंपदेंत एक कांहीं तरी नवीन भर घालतो आणि मानवांच्या भौतिक प्रगतीला साहाय्य करतो, त्याचप्रमाणें थोर लेखक किंवा कलावंत मानवाच्या अनुभवभांडारांत किंवा जीवनाच्या जाणिवेंत ( Consciousness of life ) कांहीं तरी नवीन भर घालतो, आणि जीवनाच्या प्रगतीला—उन्नतीला हातभार लावतो. मानवी अनुभवाचें क्षेत्र विस्तृत करणारा—जीवनाच्या असंख्य अज्ञात कोंपऱ्यांपैकीं एखाद्यावर तरी नवीन प्रकाश पाडणारा प्रत्येक मोठा लेखक अशा तऱ्हेनें साहजिकच पुरोगामी असतो. मग त्याच्या कथेचा विषय एखाद्या दुबळ्या युवकाचा प्रेमभंग असो, कीं लाल बावटेवाल्यांच्या उज्वल पराक्रमावर तो आपली कादंबरी लिहो.

ही कसोटी 'ज्वाले'ला लावली तर प्रेमी युवकाची एक कथा म्हणून सुद्धां त्यांत अपूर्व किंवा वैशिष्ट्यपूर्ण असें कांहीं नाहीं. भाषा आणि वर्णनें सुंदर आहेत, पण तेवढ्यानें कादंबरीला मोल येऊं शकत नाहीं. भावनांच्या आणि निसर्गदृश्यांच्या वर्णनाची आलटून पालटून पुनरुक्ति झाल्यामुळें वाचकांना कंटाळा मात्र येऊं लागतो. बरें, इतर कांहीं नवीन वैशिष्ट्यपूर्ण नाहीं, पण निदान कांहीं उत्कंठावर्धक घटना तरी कथानकांत आहेत म्हणावें तर तसेंही कांहीं नाहीं. त्यामुळें तर कादंबरी विनाकारण लांबवल्यासारखी वाटते. एकीच्या बाहुपाशांतून दुसरीच्या आणि दुसरीच्या आलिंगनांतून तिसरीच्या आलिंगनांत गुरफटून जाणाऱ्या आणि अधूनमधून निनीच्या नांवानें ओक्साबोक्शीं हंबरडा फोडणाऱ्या प्रभाचा शेवटीं शेवटीं विलक्षण कंटाळा येऊं लागतो. खुद्द प्रभालाच त्याचा कंटाळा

येतो, मग वाचकांची काय कथा ? तोच पान १०१ वर म्हणतो, “...आतां ही डायरी लिहायचासुद्धां खरोखर कंटाळा आला आहे मला. रोज रोज लिहायचें तरी काय नवीन ? तेंच तेंच. रोज फिरून फिरून एकसारखें तेंच तें ! तीच ती रोजचीं रडगाणीं ! त्यापेक्षां मला वाटतें रोज मी निनीसहस्रनाम लिहून काढावें...” अर्थात् या प्रेमकथेंत प्रेमासंबंधीं कांहीं नवीन किंवा अपूर्व दिसत नाहीं, त्याचें आश्चर्य वाटावयाचें कारण नाहीं. पुस्तकी ज्ञान आणि स्वतःचीं स्वप्नें यावर वाढलेला माणूस जीवनाविषयीं—माणसाच्या जगाविषयी काय सांगू शकणार ? तारुण्योन्मादांत त्याला जें व्हावें असें वाटत होतें तें झालें; घरबसल्या तो जीं सुखस्वप्नें पहात होता तीं खरीं झालीं, अशी स्वतःची समजूत करून घेऊन माधवमनोहरांनीं पुढें आणलेल्या या लेखकानें ही प्रेमकथा लिहिली आहे. म्हणूनच ही कादंबरी जीवनाचें दर्शन देणारी नसून तरुण वाचकांची इच्छापूर्ति ( Wish-fulfilment ) करणारी आहे. तरुणपणीं नायडूला खेळतांना पाहिलें, कीं आपण नायडूसारखा मोठा क्रिकेटर व्हावें असें वाटतें. एखाद्या नटाचा उत्कृष्ट अभिनय आणि त्याची लोकप्रियता पाहिली कीं मोठा नट व्हावेंसें वाटतें. पुढाऱ्यांचे जयजयकार ऐकले कीं पुढारी व्हावेसें वाटतें, पण वास्तव जीवनांत आपण तसे होतों का ? लहानपणीं असल्या स्वप्नांत दंग झालेला माणूस पुढल्या आयुष्यांत रेल्वे ऑफिसांत पार्सल क्लार्क किंवा म्युनिसिपालिटींत मुकादम झालेला दृष्टीला पडतो. हें जीवन. ‘ज्वाले’चा नायक उत्तम चित्रकार आहे. पहिला प्रतीचा कवि आहे. पट्टीचा गाणारा आहे. एक नंबरचा वक्ता आहे. साम्यवादी पुढारी आहे ( तो गामासारखा पहिलवान किंवा लुईसारखा बॉक्सर कां नाहीं ? ) तरुण आहे. त्याचे डोळे मोठे आहेत. त्याचे केस कुरळे आहेत. त्याचें कोकणांतल्या खेड्यांत सुंदर घर आहे. ओढायला पांढऱ्या विड्या आहेत. प्यायला व्हिस्की आहे. सुंदर बायको आहे. त्याशिवाय डोकें चेपायला जाई आहेच. आणि निनीचें प्रेम तर त्याच्यावर आहेच आहे. हीं तरुण मनाचीं स्वप्नें; हें वास्तवजीवन नव्हे.

लेखकाच्या प्रेमाबद्दलच्या कल्पनाही अशाच खुळ्या आहेत. हरिभाऊ

आपट्यांच्या पुस्तकांतलें " खरें प्रेम एकदांच उद्भवतें, एकाच ठिकाणीं जडतें, आणि त्याच ठिकाणीं तें सतत रहातें..." हें वाक्य वाचून लेखकानें स्त्रीपुरुषांमधल्या प्रेमभावनेची कल्पना केली आहे. या वाक्यांत हरिभाऊ आपटे कसल्या प्रेमाबद्दल बोलत आहेत तें मला माहीत नाहीं. पण तरुणतरुणींना आयुष्यांत एकदां वेडेंपिसें करून टाकणाऱ्या, कथा-कादंबऱ्यांचा विषय झालेल्या त्या विशिष्ट प्रेमभावनेबद्दल ते जर वरील तऱ्हेचे उद्गार काढीत असतील, तर त्यांच्या श्रेष्ठतेबद्दल आणि योग्यते-बद्दल पूर्ण आदर बाळगूनही मी म्हणतों, कीं निदान जीवनांतल्या या बाबतीसंबंधीं तरी त्यांना कांहीं माहिती दिसत नाहीं. कांहीं काळ या भावनेनें माणूस वेडापिसा, बेभान होतो,–एका विशिष्ट स्त्रीशिवाय जीवन जगणें अशक्य आहे असें त्याला प्रामाणिकपणें वाटतें, हें खरें आहे. ती स्त्री मिळाली नाहीं म्हणजे तो भग्नहृदय होऊन कांहीं दिवस 'हाय' खातो हेंही खरें आहे. पण कांहीं दिवसानीं ती जखम बरी होऊन तिचा फक्त वण राहतो. तो आपले नेहमींचे उद्योगधंदे शांतपणें करूं लागतो. फार काय, पुन्हां तितक्याच प्रामाणिकपणें तो प्रेमांतही पडूं शकतो, हेंही तितकेंच खरें आहे. खरें प्रेम अनेक वेळां उद्भवतें, अनेक ठिकाणीं जडतें आणि एका ठिकाणीं सतत मुळींच राहत नाहीं, हेंच खरें. मात्र पत्नी-विषयीं, मुलांविषयीं किंवा मातेविषयीं माणसाच्या मनांत वसत असलेला स्निग्ध स्थायीभाव आणि आयुष्यांत कांहीं काळ वेडें करून टाकणारी प्रेमभावना यांचा कुणी घोंटाळा करूं नये. म्हणूनच मी म्हणतों, कीं एकदां प्रेमभंग झाल्यावर जन्माची 'हाय' घेऊन शेवटीं मरून गेलेला प्रभा हा वास्तव सृष्टींतला माणूसच नव्हे. तरुण, अननुभवी लेखकांच्या कल्पनेंतलें हें भूत आहे. या एकंदर अवास्तवतेवर अगदीं शेवटचा परिपूर्णतेचा हात फिरविण्याकरतांच कीं काय, लेखकानें 'सनसनाटी' भरेला आणि 'धमाली'चा असा कादंबरीचा शेवट केला आहे.

श्रेष्ठ वाङ्मयाची कठोर कसोटी लावून मीं 'ज्वाले' चें परीक्षण केलें त्याचीं दोन कारणें आहेत. माधव मनोहर माझे स्नेही आहेत, आणि त्यांच्या व्यासंगाबद्दल आणि बुद्धिमत्तेबद्दल मला आदर आहे.

एखाद्या नवाशिक्या लेखकाच्या कृतीला दयाबुध्दीनें लावावयाची कसोटी मी त्यांच्यासारख्या पट्टीच्या लेखकाच्या कृतीला लावली असती, तर त्यांच्याबद्दल वाटणाऱ्या स्नेहाशीं मीं बेइमानी केली, असें मला वाटलें असतें. दुसरें असें, कीं असली साधी कसोटी लावून त्यांची कृति तपासावयाची म्हणजे त्यांच्या बुद्धीचा अपमान करण्यासारखें आहे. तसलीच कसोटी लावली तर स्तुति करण्यासारख्या या कादंबरींत किती तरी गोष्टी आहेत. माधव मनोहरांची भाषा इतकी नाजूक, अर्थवाही आणि कमावलेली आहे, कीं असामान्य भाषाप्रभुत्व असलेल्या माड-खोलकरांची मधून मधून आठवण होते. सूक्ष्म, हळव्या भावना व्यक्त करण्याचें आणि निसर्गातलीं तरल दृश्यें रंगविण्याचें त्यांचें कौशल्य असाधारण आहे. पण असली स्तुति त्यांना हवी कशाला ? स्वतः त्यांनाही आपली ही कृति मोठी महत्वाची आहे असें वाटत नाहीं, हें प्रस्तावनेवरूनच दिसतें. माझ्यासारखे लोक त्यांच्याकडून अपेक्षा करतात ती त्या अननु-भवी, नवशिक्या, दिवंगत माधव मनोहरांच्या कृति पुढें आणण्याची नव्हे, तर आम्ही ज्या रसिक, व्यासंगी, व अनुभवांनीं प्रतिभा परिणत झालेल्या माधव मनोहरांना ओळखतों त्याच्या कलाकृतीची.

———

# स्वप्नरंजन : : १०

## आणि वास्तववाद

प्रिय माधव मनोहर यांस,

स. न. वि. वि.

आपलें पत्र वाचलें. खरें म्हटलें तर परीक्षणावर लेखकांनीं लिहिलेलीं उत्तरें आणि त्यांना पुन्हा संपादकांचीं प्रत्युत्तरें साप्ताहिकें किंवा मासिकें छापूं लागलीं, तर त्यांना दुसरा कांहीं मजकूर छापावयालाच नको. तेव्हां तुमचें उत्तर व त्याला माझें प्रत्युत्तर मी छापतों आहें हें नियम म्हणून नव्हे, तर केवळ अपवाद म्हणून. टीकाकार म्हणून तुमची ख्याति आहे, आणि निमित्त 'ज्वाले'चें असलें तरी 'वास्तववाद' 'स्वप्नरंजन' 'कलाकृतीची अंतिम कसोटी' इत्यादि वाङ्मयक्षेत्रांतले महत्त्वाचे प्रश्न तुम्हीं या उत्तरांत उपस्थित केले आहेत; तेव्हां तुमचें उत्तर छापणें आणि थोडक्यांत तुम्हीं उपस्थित केलेल्या मुद्यांचा परामर्ष घेणें मला श्रेयस्कर वाटतें. पत्राच्या आरंभींच तुम्ही माझा जो गौरव केला आहे त्याबद्दल मी अंतःकरणपूर्वक तुमचे आभार मानतों आणि एकदम तुमच्या मुद्यांकडे वळतों.

( १ ) सुंदर वर्णनशैली, असामान्य अर्थवाही भाषाशैली, आणि हळव्या भावना व्यक्त करण्याचें वा निसर्गातील तरल दृश्यें रंगविण्याचें असाधारण कौशल्य हे सारे वाङ्मयगुण मला मुळींच उपेक्षणीय वाटत

नाहींत. आदर्श—वाङ्मयकृतींत ते अवश्यमेव हवेत; पण हे गुण साहित्य-कृतीचें मूल्यमापन करतांना मला गौण वाटतात. माझ्या ' ज्वाले ' च्या परीक्षणांतल्या ' पुरोगामी कलावन्ताची कसोटी ' या शीर्षकाच्या परिच्छेदांत कुठलें वाङ्मयगुण मला प्रधान वाटतात ते मीं सांगितले आहेत. ते तुम्ही पुन्हा वाचावेत. वाङ्मयकृति स्वप्नरंजनात्मक असो वा वास्तववादी असो, तिच्यांत उपरनिर्दिष्ट वाङ्मयगुण असावेत असा माझा अट्टाहास आहे; वास्तवतेच्या एकमेव निकषावर कोणत्याही साहित्यकृतीचें मूल्यमापन झालें पाहिजे असा माझा अट्टाहास नाहीं. तुमच्या ' ज्वालें ' त ते प्रधान वाङ्मयगुण नाहीतच, पण वास्तवताही नाहीं एवढीच माझी टीका आहे; नुसती वास्तवता नाहीं एवढीच माझी टीका नाहीं. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांत, तुम्हांला महत्त्वाचे वाटत असलेले आणि मला गौण वाटत असलेले वाङ्मयगुण नाहींत हें मला कबूल आहे. म्हणूनच मला वाटतें, डॉ. केतकर तुम्हांला थोर कादंबरीकार वाटत नाहींत; मला ते थोर वाटतात. त्यांच्या कादंबऱ्यांत भाषासौंदर्य इत्यादि गौण वाङ्मयगुण, इतर प्रधान गुणांखेरीज असते, तर ते मला आणखी थोर वाटले असते.

( २ ) फडके, खांडेकर, माडखोलकर हे कादंबरीकार तुम्हांला वाटतात तसे मला मुख्यत्वेंकरून ' स्वप्नाळू ' वाटत नाहींत. त्यांच्या कृतींत जो थोडाबहुत ' स्वप्नाळू'पणा आहे तोच त्यांचा दोष आहे. त्यांच्या कलाकृतीत जी कांहीं ' वास्तवता ' आणि ' जीवनावर कांहीं नवा प्रकाश पाडण्याची शक्ति ' ( माझा मोठेपणाचा निकष ) आहे, तिच्यांत त्यांचा थोरपणा आहे. फडके, खांडेकर, माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतल्या वास्तवतेवरून किंवा जीवनदर्शनावरून मी त्यांचें महत्वमापन करूं पाहातों. तुम्हांला या गोष्टी कःपदार्थ वाटतात; तुम्ही भाषासौंदर्य, वर्णनकौशल्य इत्यादिवरून त्यांचीं पुस्तकें ' निःसंदेह श्रेष्ठ कलाकृति ' ठरवितां. नशीब बिचाऱ्यांचें, तिसरा कुणी टीकाकार त्यांच्या बहुतेक पुस्तकांवरील तिरंगी वेष्टन, सुवाच्य छपाई आणि उत्कृष्ट बांधणीवरून त्यांच्या कादंबऱ्या ' निःसंदेह श्रेष्ठ कलाकृति ' ठरवीत नाहीं !

( ३ ) वास्तवतेचें तुम्हांला जर महत्त्व वाटत नाहीं, तर या 'स्वप्नाळू कलाकारां'त वास्तवतेचा आढळ होत नाहीं म्हणून तुम्ही ' हळहळलांत ' कां !—त्या ' अवास्तव आहेत म्हणून सतत आक्षेप घेत ' कां आलांत ? आणि मग तुमच्या कृतीत वास्तवता नाहीं म्हणून मी हळहळलों किंवा आक्षेप घेतला तर तुमची तक्रार कां ?

(४) स्वप्नरंजन आणि इच्छापूर्ति यांचा कृपा करून घोटाळा करूं नका. ' अरेबियन नाईट्स ' किंवा ' मिड्समर नाईट्स् ड्रीम ' या स्वप्नरंजनात्मक कृति आहेत; पहातां पहातां नाहींशा होणाऱ्या पऱ्या किंवा पंख असलेले घोडे यांच्या गोष्टी वाचणें माणसाला आवडतें आणि तें योग्यही आहे. किंबहुना या तऱ्हेच्या स्वप्नरंजनाला जीवनांत आणि वाङमयांत अवश्यमेव स्थान आहे. इच्छापूर्ति म्हणजे खोटा वास्तववाद. लॉटरी यावी, सुंदर बायको मिळावी, फर्स्ट क्लासांतून प्रणयकूजन करीत फिरावें अशा माणसाच्या चोरट्या इच्छा असतात. तशा इच्छा माणसाला असतात असें कुणी वाङमयांत दाखविलें तर तोही वास्तववादच. पण त्या इच्छांप्रमाणें खरोखरच घडलें, लॉटरी आली, सुन्दर बायको मिळाली, सर्व कांहीं यथास्थित झालें—असें कांही तरी अपवादात्मक, बहुधा न घडणारें दाखविणें म्हणजे इच्छापूर्तीचें,—जीवनावर चुकीचा प्रकाश पाडणारें वाङमय, किंवा खोटा वास्तववाद.

मला जीवनांत किंवा वाङमयांत स्वप्नरंजन नको, हा तुमचा भयंकर गैरसमज आहे. जीवनांतल्या रहस्यांवर प्रकाश पाडणारें वाङमय स्वप्नरंजनात्मक असो वा वास्तववादी असो त्याला मी थोर वाङमयच म्हणणार, आणि मला तें नेहमीं हवेंसेंच वाटणार. मला नको फक्त खोटा वास्तववाद.

थोर कृतीचा माझा हा पुन्हां पुन्हां सांगितलेला निकष आहे. ती कृती वास्तववादी असेल तर तिच्यांत चांगली वास्तवता आहे का मी पाहीन, स्वप्नरंजनात्मक असेल तर उच्च प्रकारचें स्वप्नरंजन तिच्यांत आहे का पाहीन. ' ज्वाला ', मला ' मिडसमर नाईट्स् ड्रीम् ' किंवा ' अरेबियन नाईट्स ' सारखी स्वप्नरंजनात्मक किंवा अद्‌भुतरसात्मक वाटत

नाहीं; ती वास्तववादी वाटते. म्हणून तिच्यांत वास्तवता कसल्या प्रकारची आहे तें पाहिलें. लेखक आपली कृति वास्तववादी म्हणतो म्हणून ती वास्तववादी, किंवा स्वप्नरंजनात्मक म्हणतो म्हणून ती स्वप्नरंजनात्मक म्हणावयाचें नसतें. तसें झालें तर टीकाकारानें वास्तववादी निकष लावला, की माझी कृति स्वप्नरंजनात्मक आहे म्हणून तो पळवाट काढील, आणि स्वप्नरंजनाचा लावला कीं ती वास्तववादी आहे म्हणून वेड पांघरील.

( ५ ) माझ्या सर्वच ‘ पहिल्या अपत्यां-’ ची मला लाज वाटत नाहीं. उदाहरणार्थ, ‘चांदराती’ची; कारण त्यांत बरेंचसें स्वप्नरंजन आहे. पण ‘मोरपिसां’तल्या कांहीं गोष्टींची जरूर लाज वाटते; कारण त्यांत इच्छापूर्ति आहे. तुमच्यांतला आणि माझ्यांतला फरक तुम्हीं जो दाखविला आहे तो मला सर्वथैव मान्य आहे. मला तरुण वयांत लिहिलेल्या माझ्या नवथर, इच्छापूर्तीच्या वाङ्मयाची लाज वाटते; तुम्हांला तुमच्या तसल्याच वाङ्मयाची लाज वाटत नाहीं;—तुम्ही त्याचें समर्थन करतां. परमेश्वर ( असला तर ) तुमचें रक्षण करो !

( ६ ) माझी ‘ प्रेमाचा मोसम ’ ही लघुकथा आदर्श वास्तववादी आहे असें मीं कुठें म्हटलें आहे ? ती वास्तववादी करण्याचा मीं प्रयत्न केला आहे. तारुण्योन्मादाचें एक विशिष्ट अंग या कथेंत रंगविण्याचा मीं ‘ प्रयत्न ’ केला आहे, असे माझे प्रस्तावनेंतले शब्द आहेत.

त्या लघुकथेंत वास्तववादाचा परमोच्च बिंदु गांठून मीं स्वर्गाला हात लावले आहेत असें मीं कुठेंच म्हटलेलें नाहीं,—म्हणणें शक्य नाहीं. तुमच्याइतक्याच किंबहुना अधिक अधिकारवाणीनें मी सांगतों कीं, या कथेंतली मूलभूत घटना सर्वस्वी वास्तव आहे,—माझ्या एका मास्तर-मित्राच्याबाबत घडलेली आहे. तुमच्या वास्तववादाच्या कल्पना चमत्कारिक दिसतात. तुम्हांला माहीत असलेल्या कन्याशाळेंत घडतें तेवढेंच वास्तव, आणि दुसऱ्या एकाद्या शाळेंत घडलें तर तें अवास्तव, अशी तुमची कल्पना आहे कीं काय ? आणि स्वानुभवाचा आणि वास्तवतेचा इतका

का जिव्हाळ्याचा संबंध आहे? वास्तववादी लेखकानें आपण ज्यासंबंधी लिहितों त्या प्रत्येक अनुभवांतून स्वतः गेलेंच पाहिजे असें आहे की काय? नुसत्या अनुभवाचें भांडवल जर वाङ्मयनिर्मितीला पुरत असतें, तर प्रि. अत्र्यांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे, दररोज भरपूर सृष्टिसौंदर्य पहाणाऱ्या कावळ्यांनीं वर्डस्वर्थ किंवा बालकवीपेक्षां किती तरी पटीनें अधिक सुंदर अशी सृष्टिवर्णनपर कविता लिहिली असती!

माझ्या लघुकथा किंवा कविता मी मुळींच आदर्श किंवा सर्वगुणसंपन्न समजत नाहीं, हें तुम्हांला कळविण्याची मी परवानगी घेतों. दुसऱ्या लेखकाच्या कवितेचें किंवा कथेचें परीक्षण करतांना माझ्या कथेशीं किंवा कवितेशीं मी त्यांची मुळींच तुलना करीत नाहीं. आदर्श कथा किंवा कविता कशी असावी याबाबत माझ्या कांहीं बऱ्यावाईट कल्पना आहेत. त्या निकषावर मी ती कलाकृति घासतों. फार काय, माझ्या स्वतःच्या कथाही निर्दयपणें या निकषावर घासून त्या भिकार किंवा टाकाऊ मी ठरवूं शकतों, हें 'मो·पिसां'च्या प्रस्तावनेवरून तुम्हीं पाहिलेंच असेल.

क्षणभर तुमच्या समाधानासाठीं 'प्रेमाच्या मोसमां-'त बरीचशी अवास्तवता आहे असें धरून चालूं. त्यामुळें 'ज्वालें-' तली अवास्तवता कशी काय समर्थनीय ठरते? एखादा मनुष्य गाढव आहे असें दुसऱ्यानें सिद्ध केलें, तर पहिल्यानें दुसऱ्याला गाढव ठरविण्यानें काय सिद्ध होतें? फार तर एका गाढवाऐवजीं दोन गाढवें जगांत आहेत असें सिद्ध होईल. पहिला माणूस सुज्ञ असेल तर आपण गाढव कां नाहीं हें त्यानें स्वतंत्रपणें सिद्ध केलें पाहिजे.

( ७ ) मी कुठल्या 'प्रेमा'बद्दल बोलत आहें, हें तुम्हांला कां समजूं नये? माणसाला आयुष्यांत केव्हांतरी बेभान, वेडापिसा करून टाकणारी प्रेमभावना आणि अपत्य, पत्नी, माता यांच्याबद्दल वाटणारा स्निग्ध स्थायीभाव यांमधला फरक मीं एका परिच्छेदांत स्पष्ट केला आहे. तुम्ही तो पुन्हा वाचा म्हणजे तुम्हांला समजेल.

# सदोष स्वप्नरंजन : : ११
## कीं सदोष वास्तवता ?

'ज्वाले'च्या परीक्षणाबाबत माझा आणि माधव मनोहरांचा जो पत्रव्यवहार झाला, त्याला उद्देशून माझे मित्र श्री. प्रभाकर पाध्ये यांनीं 'धनुर्धारी-'च्या एका अंकांत 'स्वप्नरंजन आणि वास्तवता' यासंबधीं एक विचारप्रवर्तक लेख लिहिला आहे. माझ्या बहुतेक मतांशी ते सहमत असल्यामुळें त्यांच्याशीं वाद असा मला कसलाच करायचा नाहीं. पण त्यांच्या लेखामुळें कांही गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव आहे, तो दूर करण्याचा मी प्रयत्न करणार आहें.

(१) श्री. पाध्ये म्हणतात, "...स्वप्नवाङ्मयाचा ललितवाङ्मयांत अवश्य समावेश होतो, अशी काणेकरांची शास्त्रशुद्ध भूमिका आहे. परंतु इच्छापूर्तीवर आधारलेल्या वाङ्मयाचा ते स्वप्नरंजनात्मक वाङ्मयांत समावेश करावयास तयार नाहींत. त्यांच्या मतें इच्छापूर्तीचें वाङ्मय जीवनावर खोटा प्रकाश टाकतें; तें स्वप्नरंजन नव्हे, तर खोटा वास्तववाद. मला हें पटत नाहीं...मनुष्याची दिवास्वप्नें आणि इच्छापूर्ति (मी हा शब्द शुद्ध शास्त्रीय अर्थानें वापरतों.) यांचा फार निकटचा संबंध आहे...."

'इच्छापूर्ति' या शब्दाकडे भिन्न भूमिकांवरून आम्ही दोघे पहात आहोंत, म्हणून हा मतभेद निर्माण झाला आहे, असें मला वाटतें. खरोखर श्री. पाध्ये यांच्यांत आणि माझ्यांत या मुद्याबाबत मुळींच मतभेद

नाहीं, हेंच मला दाखवून द्यावयाचें आहे. श्री. पाध्ये ‘ इच्छापूर्ति ’ हा शब्द फ्रॉइड्, यूंग, ॲडलर इत्यादि मानसशास्त्रवेत्ते ज्या अर्थानें वापरतात त्या अर्थानें वापरीत आहेत; आणि त्यांनीं तसें स्पष्ट म्हटलें आहे. ही शास्त्रीय–मानसशास्त्रीय परिभाषा झाली. स्वप्नरंजनांतली जी इच्छापूर्ती ती ही मानसशास्त्रीय ‘ इच्छापूर्ति ’. या चांगल्या अर्थाच्या ‘ इच्छापूर्ति-’ ला माझा मुळींच विरोध नाहीं आणि नव्हता. हें विधान मी पश्चात्-बुद्धीनें करीत नाहीं. माझ्या ‘ स्वप्नरंजन आणि वास्तववाद ’ या लेखां-तल्या नं. ४ च्या परिच्छेदांतलीं पुढील वाक्यें पहा:—

“ ......पहातां पहातां नाहींशा होणाऱ्या पऱ्या किंवा पंख असलेले घोडे यांच्या गोष्टी वाचणें माणसाला आवडतें आणि तें योग्यही आहे...” दिवास्वप्न किंवा स्वप्नरंजन पहात असतां किंवा वाचीत असतां जी ‘ इच्छापूर्ति ’ होते ती निरोगी मनाची नैसर्गिक ‘ इच्छापूर्ति ’, –ती योग्य आवड.

( २ ) मीं ‘ इच्छापूर्ति ’ हा शब्द जो पुन्हा पुन्हा वापरला आहे, तो वाङ्मयीन टीकाशास्त्रातली परिभाषा म्हणून. ‘ वुइश फुल्फिल्मेंट लिटरेचर ’ ( एथेल एम्. डेल्, चार्लस् गार्व्हिस् इत्यादिकांचें ) हा शब्द इंग्रजी टीकावाङ्मयांत मीं पुष्कळ वेळां वाचला आहे. सुप्रसिद्ध कादं-बरीकार श्री. पु. य. देशपांडे यांच्याबरोबर कांहीं दिवसांपूर्वी चर्चा करीत असतां आम्ही दोघेहि हा शब्द अशाच अर्थानें—मानसशास्त्रीय चांगल्या अर्थानें नव्हे, तर टीकाशास्त्रीय वाईट अर्थानें—वापरीत होतों; आणि दोघांचीही न कळत एकच भूमिका असल्यामुळें बोलतांना मुळींच घोंटाळा झाला नाहीं. तेव्हां हा शब्द टीकाशास्त्रांतली विशिष्ट परिभाषा म्हणून मराठींत रूढ झाला आहे, अशी माझी समजूत झाली, आणि मीं तो निर्धास्तपणें वापरला. मला वाटतें माझी समजूत चुकीची होती. अर्थात् मराठी टीकाशास्त्रांत हाच शब्द रूढ करावा असा माझा मुळींच आग्रह नाहीं. श्री. प्रभाकर पाध्ये किंवा दुसरे कुणीही याहून चांगला किंवा अधिक समर्पक शब्द सुचवीत असतील, आणि सर्वानुमतें तो

मान्य होत असेल, तर मला आनंदच होईल. मला या शब्दानें काय म्हणावयाचें आहे तें मी स्पष्ट केलें आहे. श्री. पाध्ये यांनीं तेंच म्हटलें आहे. फक्त शब्द वेगळे वापरले आहेत. ते म्हणतात; "...किंबहुना ही स्वप्नरंजनात्मक कृति वास्तवतेचा सारा आभास निर्माण करते, याबद्दल ते लेखकावर प्रतारणेचा आरोप करूं शकतील..." या वास्तवतेच्या आभासाला—या प्रतारणेलाच मी वाङ्मयीन टीकाशास्त्रांतली दूषणीय इच्छापूर्ति म्हणतों. हें स्वप्नरंजन नव्हे, हा वास्तवतेचा आभास; म्हणजेच खोटा वास्तववाद.

( ३ ) स्वप्न, स्वप्न म्हणून पुढें येतें तेव्हां तें लेखकाची आणि वाचकाची योग्य किंवा निरोगी इच्छापूर्ति करतें; पण तें वास्तवतेच्या बुरख्यांत येतें तेव्हां 'वास्तवजीवन असें आहे;' असें सांगून लेखकाशीं आणि वाचकांशीही प्रतारणा करतें, त्यांना फसवतें—त्यांची अयोग्य, विकृत इच्छापूर्ति करतें; 'जीवनावर चुकीचा प्रकाश' पाडतें. मेघदूत, मिड्समर-नाईट्स् ड्रीम्, टागोरांचें काव्य या वाङ्मयकृति स्वप्नरंजनात्मक आहेत आणि त्या प्रामाणिकपणें स्वप्नें किंवा दिवास्वप्नें म्हणून पुढें येतात. किंवा पाध्यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'आपल्या बैठकीनें आणि घडणीनें' आपण स्वप्नें वा दिवास्वप्नें आहोंत हें वाचकांना स्पष्टपणें कळवितात. मेघाशीं बोलणारा यक्ष किंवा पंख हालवीत पुढें आलेली वनदेवी पाहिली कीं, ही मंडळी जें करीत आहेत तें आपण कधीं करूं शकूं किंवा आपलें जीवन अशा प्रकारचें कधीकाळीं होईल, अशी कल्पना शुद्धीवर असलेल्या माणसांच्या मनाला चुकूनही शिवत नाहीं. हें वाङ्मय कसलीच प्रतारणा करीत नाहीं. नैसर्गिक किंवा निरोगी इच्छापूर्ति करतें. जगांतल्या सर्व स्वप्नरंजनात्मक किंवा वास्तववादी कलाकृति वाचकांची सर्वसामान्य इच्छापूर्ति करतातच. त्यांना मुद्दाम 'इच्छापूर्तीच्या वाङ्मयकृति' असें म्हणण्याचें कारणच पडत नाहीं. 'इच्छापूर्ती-' चें वाङ्मय असें आपण म्हणतों तेव्हां अर्थातच वाईट, मनाला विकृत करणारी इच्छापूर्ति, असा अर्थ घ्यावयाचा. 'बोलका' या शब्दाचा अर्थ चांगला आहे. सर्वच माणसें बोलतात; पण आपण प्रत्येकाला बोलका म्हणत नाहीं. म्हणूनच

एखाद्याला मुद्दाम ‘ बोलका ’ असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां वाईट अर्थानें—वायफळ बडबड करणारा या अर्थानें म्हणतों.

( ४ ) वास्तवतेच्या आभासाला—प्रतारणेला मी खोटा वास्तववाद हें साध्या भाषेंत सरळपणें म्हटले तर श्री. पाध्ये आक्षेप घेतात आणि केवळ माधव मनोहराना खूष करण्याकरितां ‘ हो बुवा, तुम्ही म्हणतां स्वप्नरंजन, तर हें स्वप्नरंजन ! ’ असें म्हणतात; आणि घोंटाळ्याचा ब्रह्मघोंटाळा करतात ! माधव मनोहराच्या प्रामाणिक-पणाबद्दल मलाही यत्किंचित् संशय नाहीं. पण मी म्हटलेंच, की लेखकाची कृति डोळ्यापुढे असली, की लेखक तोंडीं किंवा प्रस्तावनेंत किंवा खासगी पत्रानें काय म्हणतो हें टीकाकारानें पहावयाचें नसतें. लेखकाचें अस्तित्व अजिबात विसरून फक्त ती कृति आणि तिचा अर्थ इतक्यांचाच विचार करावयाचा असतो. स्वतः श्री. प्रभाकर पाध्ये यांच्याच शब्दांत हवी तर ‘ धनुर्धारी ’ चे संपादक श्री. पाध्ये यांची खात्री करून देतों. पाध्ये म्हणतात,

“...‘ ज्वाला ’ कादंबरीची बैठक आणि घडण वास्तवसृष्टींतली असल्यामुळें काणेकरांनीं वास्तवतेचा निकष लावला. माधव मनोहरांनीं प्रस्तावनेंत काय म्हटलें आहे, यापेक्षां कादंबरीचा प्रथमप्रत्यय कोणता येतो तो लक्षात घेऊन काणेकरांनीं वास्तवतेची कसोटी लावली. यांत त्यांची कांहींच चूक नाहीं...” थोडक्यांत पाध्ये यांनीं हेंच सिद्ध केलें आहे, की ‘ वास्तवतेच्या आभासाला किंवा प्रतारणेला ’ वास्तववादाचा निकष लावून खोटा वास्तववाद म्हणणारे काणेकर यांनीं कांहींच चूक केली नाहीं; केवळ मनोहरांच्या प्रामाणिकपणानें हृदय विरघळल्यामुळें स्वतःच्या मताविरुद्ध माधव मनोहरांच्या प्रस्तावनेवर विसंबून श्री. प्रभाकर पाध्ये यांनींच ती कृति स्वप्नरंजनात्मक आहे असें धरून चालण्यांत आणि तिला स्वप्नरंजनाची कसोटी लावण्यांत चूक केली आहे. आतां श्री. पाध्ये यांचा घोंटाळा माझ्या शब्दांत सांगतों. वास्तवतेच्या आभा-साला ‘ सदोष इच्छापूर्तीचें स्वप्नरंजन ’ असें म्हणण्याचा द्राविडी प्राणा-

याम पाध्ये करतात; मी त्याला थोडक्यांत इच्छापूर्तीचें किंवा खोट्या वास्तववादाचें वाङ्मय म्हणतों. जीवनावर नवा प्रकाश टाकणारें किंवा जीवनाचा नवा प्रत्यय देणारे म्हणा, जें वाङ्मय तें उत्तम वाङ्मय. या वाङ्मयाचे दोन भागः स्वप्नरंजनात्मक आणि वास्तववादी. 'वास्तवतेचा आभास' उत्पन्न करणारें किंवा 'सदोष इच्छापूर्ति' [ दोन्ही पाध्यांचे शब्द ] करणारें वाङ्मय स्वप्नरंजनाच्या सदरात टाकून त्याला वाईट स्वप्नरंजन ठरविण्याचा पाध्ये प्रयत्न करीत आहेत. याच वाङ्मयाला वास्तववादाच्या सदरांत टाकून त्याला खोटी किंवा वाईट वास्तवता ठरविण्याचा मी प्रयत्न करीत आहें. आणि मी बरोबर आहे आणि पाध्ये चूक आहेत हें पाध्ये यानींच सिद्ध केलें आहे !

———

# गद्यगीत : : १२

## एक नवीन वाङ्मयप्रकार

श्री. शशांक यांनीं प्रस्तुत गद्यगीत–संग्रह प्रस्तावना लिहिण्याकरितां म्हणून जेव्हां माझ्यासमोर ठेवला, तेव्हां एक प्रकारच्या अपूर्व कुतूहलानें मी तो पहिल्यापासून शेवटपर्यंत वाचून पाहिला. मला कुतूहल वाटावयाचें कारण हेंच कीं, ' गद्यगीत ' हा एक नवीनच वाङ्मयप्रकार मराठींत रूढ होऊं पहात आहे. श्री. शशांक आणि कराचीचे श्री. शङ्कर साठे या दोन लेखकांखेरीज या प्रकाराचे मराठींत आणखी कुणी पुरस्कर्ते आहेत किंवा नाहींत, हें निदान मला तरी माहीत नाहीं. भावगीत, लघुकथा, सुनीत इत्यादि मराठींत रूढ झालेल्या नवीन वाङ्मयप्रकारांप्रमाणेंच ' गद्यगीत ' हा प्रकार आहे तरी काय, याचीं अंगोपांगें कशीं असावीं, उत्कृष्ट गद्य-गीताची कसोटी काय, इत्यादि प्रश्नांचा उलगडा अजून कुणीच केलेला नाहीं.

भावगीत, लघुकथा, सुनीत इत्यादि प्रकार युरोपांतून मराठींत आले आणि या प्रकारांच्या स्वरूपाचा युरोपियन वाङ्मयांत भरपूर ऊहापोह झालेला असल्यामुळें मराठींतही त्यांच्या सर्वसाधारण स्वरूपाविषयीं संश-यित परिस्थिति राहिलेली नाहीं. गद्यगीताची स्थिति तशी नाहीं. हा प्रकार युरोपमधून इथें आलेला नाहीं. तेव्हां गद्यगीताच्या स्वरूपाची चर्चा जर करावयाची असेल, तर ती स्वतंत्रपणें करावी लागेल; आणि हा प्रकार मराठींत जर अधिकाधिक रूढ होत गेला, तर माझ्यापेक्षां अधिक

अधिकारी असलेले विद्वान् आणि व्यासंगी टीकाकार त्याची विस्तृत चर्चा करतीलच. तोंपर्यंत श्री. शशांकांच्या ‘ मरीचिका ’ वाचल्यानंतर सर्वसाधारण ‘ गद्यगीत ’ या वाङ्मयप्रकारासंबंधीं आणि त्यांतल्या त्यांत ‘ मरीचिके-’ विषयीं माझ्या मनांत जे विचार आले, ते जसेच्या तसे पुढें मांडण्याचा माझा विचार आहे. हेतु इतकाच कीं, वर उल्लेखिलेल्या विस्तृत व सांगोपांग चर्चेला त्यामुळें थोडीबहुत का होईना, पण चालना मिळावी.

पहिल्यांदाच मला एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. गद्यगीतांना मी निर्भेळ काव्य म्हणावयाला कबूल नाहीं. माझा हा सनातनीपणा पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटेल; पण त्याला कारणें आहेत. गद्यकाव्य (Prose-Poetry) किंवा काव्यमय गद्य ( Poetic Prose ) असे वाक्प्रचार रूढ आहेत; पण वाक्प्रचार यापलीकडे त्यांना महत्त्व नाहीं. काव्य (Poetry) आणि गद्य (Prose) हे जे वाङ्मयाचे अनादि कालापासून दोन ढोबळ भाग पडले आहेत, ते सकारण आहेत, असें मला वाटतें. अर्थात् नुसती छन्दोमय रचना म्हणजे काव्य नव्हे, अथवा एखादी गोष्ट केवळ शार्दूलविक्रीडितांत किंवा मुक्त छंदांत सांगितली आहे, म्हणून तीच गोष्ट कुणी उत्कृष्ट गद्यांत सांगितली असेल, तर वाङ्मयदृष्ट्या ती छंदोमय गोष्टच अधिक श्रेष्ठ ठरेल, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. गद्यापेक्षां काव्य श्रेष्ठ किंवा काव्यापेक्षां गद्य श्रेष्ठ, हें ठरविण्याचा माझा उद्देश नाहीं. माझ्या म्हणण्याचा इत्यर्थ हाच की, निर्भेळ काव्य छंदोमय स्वरूपच धारण करतें. आणि म्हणूनच काव्य हा शब्द उच्चारल्याबरोबर सामान्य माणसाच्या डोळ्यासमोर छंदोमय रचनेचें जें चित्र उभें राहतें, तें रास्तच होय.

काव्याच्या छंदोमय रचनेवर मीं जो हा भर देत आहें, त्यांत माझा हेतु काव्य म्हणजे छंदोमय रचना अशी व्याख्या करण्याचा किंवा काव्याचें स्थूल किंवा सूक्ष्म स्वरूप ठरविण्याचा नाहीं. पुराणकालांतल्या संस्कृत वाग्भटांपासून तों विसाव्या शतकांतल्या अद्ययावत् युरोपियन टीकाकारांपर्यंत सर्वांनीं तें ठरविण्याचा प्रयत्न करून ‘ नेति ’ ‘ नेति ’ म्हणून हात टेकले आहेत. तेव्हां त्या प्रांतांत मी शिरूंच इच्छीत नाहीं. काव्यांतील

छंदाचें महत्त्व वर्णन करतांना टॉल्स्टॉयचें एक वाक्य माझ्या डोळ्यासमोर आहे. टॉलस्टॉय म्हणतो:–“ There is nothing that cannot be said in prose. ” जें गद्यांत सांगतां येणार नाहीं असें कांहींच नाहीं. मला वाटतें टॉलस्टॉयचा काव्यावर कटाक्ष आहे. त्याचें म्हणणें असें कीं, तुम्ही जें जें कांहीं काव्यांतून सांगतां तें तें सर्व आम्ही गद्यांतून सांगूं शकतों. मग तुमची ती छदाची भानगड विनाकारण हवी कशाला ? गद्याच्या बाजूनें काव्यावर हा हल्ला चढवितांना आपण एक अत्यंत तर्कदुष्ट विधान करीत आहोंत, हें टॉलस्टॉयच्या लक्षांत आलेलें दिसत नाही.

कुणीही काव्यभक्त काव्याची बाजू मांडतांना असें मुळीच म्हणत नाहीं कीं, गद्यांत जें सांगतां येत नाहीं, तें आम्ही काव्यांतून सांगतों; किंवा काव्यांतून आम्ही जें सांगतों, तें गद्यांतून सांगतांच येणार नाहीं. काव्यांतला आणि गद्यांतला फरक ‘ काय ’ सांगावयाचें यांत नसून, तें ‘ कसें ’ सांगितलें जातें, यांत आहे; आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं, वाङ्मयनिर्मात्यापुढे गद्यभाषा आणि छंदोरचना असे दोन नमुने पडलेले असतात आणि कोणतीही गोष्ट सांगावयाची असली कीं, ती सांगण्याकरितां हा किंवा तो नमुना तो शांतपणें माध्यम म्हणून निवडतो, अशी परिस्थिति नसते. मुद्दामच एक पौराणिक उदाहरण घेऊन ही गोष्ट मी अधिक विशद करतों.

काव्याचा जन्म अवनीतलावर कसा झाला, यासंबंधीं जी अद्‌भुतरम्य कथा पुराणांत आहे, ती अत्यंत अर्थपूर्ण आणि प्रतीकात्मक आहे, असें मला वाटतें. स्वैरपणें विहार करणाऱ्या एका क्रौंचमिथुनावर शरसंधान करून एका निषादानें त्याला घायाळ केलें. तें हृदयविदारक दृश्य वाल्मीकि मुनींच्या दृष्टीला पडलें आणि अंतःकरण कळवळून संतापानें “ मा निषाद......” ही त्वेषयुक्त शापवाणी अनुष्टुभ् छंदांत त्या क्षणीं त्यांच्या मुखांतून अवतीर्ण झाली. हें जगांतलें पहिलें काव्य. अनुष्टुभ् हा पहिला छंद आणि वाल्मीकि हे आद्य कवि. वाल्मीकींना तो शाप काय गद्यांत देतां आला नसता ? पण तो शाप गद्यांत द्यावा कीं पद्यांत द्यावा,

हा प्रश्न नव्हता. तें क्रूर कृत्य पाहून अनन्यसाधारण दया आणि क्रोध या उत्कट विकारांनीं विकल झालेल्या आद्य कवीच्या मुखांतून बाहेर पडलेल्या शापवाणीनें छंदोमय रूप धारण केलें.

थंड लोखंडाचा तुकडा आणि भट्टींत घातलेल्या लोखंडाचा प्रवाह करून वाहणारा लाल लाल तप्त रस, यांत जो फरक तोच गद्यवाङ्मय-रूपानें दिसणाऱ्या मानवी जीवनाच्या विशिष्ट खंडांत, आणि कविमनांत पेटलेल्या भावनांच्या भट्टींत तप्त झाल्यामुळें छंदोमय प्रवाह करून वाहणाऱ्या काव्यरूप जीवनखंडांत. लोहखंडाच्या तप्त—रसाला तो प्रवाह जितका नैसर्गिक, तितकीच त्या विशिष्ट वाङ्मयाला छंदोमय रचना स्वाभाविक. कलावंत आपलें हृद्गत गद्यमय भाषेंत किंवा छंदोमय रचनेंत कसेंही व्यक्त करतो; पण केव्हां केव्हां त्याच्या भावना उत्कटत्वाच्या इतक्या भराला पोहोंचतात कीं, त्या व्यक्त करण्याचा तो प्रयत्न करूं लागला, म्हणजे स्वतः होऊनच त्या छंदोमय रूप धारण करतात. काव्याची आणि उत्कटत्वाची सामान्य माणसाकडून कळत अगर न कळत जी सांगड घातली जाते, ती यामुळेंच.

कोणत्याही गद्य वाङ्मयांत सुद्धां एखादा भाग अत्यंत उत्कट भावनांनीं युक्त असा वाटूं लागला कीं, 'किती काव्यमय आहे हें!' असे उद्गार आपल्या तोंडांतून नकळत बाहेर पडतात. उत्कटत्वानें रसरसलेला हा भाग जर जरा अधिक सूक्ष्म दृष्टीनें आपण अभ्यासला, तर त्यांत एक प्रकारची नादमधुर तालबद्धताही आपणांला आढळून येईल. काव्या-प्रमाणेंच उत्कृष्ट गद्यांतही सूक्ष्म स्वरूपांत कां होईना, पण एक तालबद्धता ( Rhythm ) असते. डिकन्सच्या 'Old Curiosity Shop' या कादंबरींत ज्या प्रकरणांत त्यानें नायिकेच्या—छोट्या नेलच्या—मृत्यूचें वर्णन केलें आहे, त्या प्रकरणांतलें गद्य इतकें चेतोहर आणि तालबद्ध आहे कीं, वाचतांना आपण एखादें सुंदर काव्य वाचीत आहोंत, असा भास होऊन अंतःकरण हेलावून जातें.

हीच स्थिति श्री. पु. य. देशपांडे यांच्या 'सदाफुली' कादंबरीं-

तील ‘ एक एकाकी दगड आणि पक्षी ’ हें प्रकरण वाचतांना होते. एका इंग्रजी टीकाकारानें तर ‘ Old Curiosity Shop ’ मधलें उपरोक्त प्रकरण वाक्यांत किंचित् फेरबदल करून उत्तम नियमक छंदांत (Blank Verse) बसवून दाखविलें आहे, म्हणतात !

टॉल्स्टॉयच्या काव्यावरील किंवा छंदोमय रचनेवरील हल्ल्याला बिन-तोड उत्तर हेंच कीं, तुमचें हृद्गत तुम्ही जेव्हां अत्यंत उत्कटत्वानें व्यक्त करूं लागतां, तेव्हा तुमचें गद्य आपोआपच तालबद्ध स्वरूप धारण करूं लागतें—तें छंदोमय होऊं लागतें ! आणि काव्यप्रदेशाच्या सीमेशीं तें इतकी लगट करूं लागतें कीं, ‘ Old Curiosity Shop ’ मधल्या त्या प्रकरणाप्रमाणें तें काव्यांत केव्हा जमा होईल, त्याचा नेम रहात नाहीं.

उत्कटत्वाच्या या विशेषामुळें जो अर्थ व्यक्त करावयाला, गद्याला केवढा तरी शब्दविस्तार करावा लागतो, तोच अर्थ मोजक्या पण रसरसलेल्या शब्दांनीं काव्य अधिक परिणामकारक रीतीनें व्यक्त करतें. दुसरी गोष्ट अशी कीं, छंदोमयतेमुळें काव्य वाचकाच्या मनांत कितीतरी काळ घोळत राहूं शकतें आणि त्यामुळें काव्यांत वर्णिलेला परिणाम रसिकांच्या स्मृतिपटलावर अधिक काळ उमटून राहतो.

उत्कटत्वामुळें उत्पन्न झालेलें अल्पाक्षरबव्हर्थत्व आणि तालबद्ध छंदो-मयता हे दोन गुण आणि छंदोमयतेमुळें आलेली चिरपरिणामक्षमता हा तिसरा उपगुण, या विशेषांनीं काव्य गद्यावर केव्हांही सरशी करूं शकेल, असें मला वाटतें. अर्थात् काव्यानें गद्यावर केलेली ही कुरघोडी सिद्ध करतांना उत्कृष्ट गद्याच्या जोडीला, वाटेल ती निकृष्ट छंदोमय रचना बसवून चालणार नाहीं; छंदोमय रचनेचें—काव्याचें उत्कृष्ट उदाहरणच पुढें आणावें लागेल.

वाङ्मयांत कलावंताच्या हृद्गतव्यक्तीसाठीं काव्य आणि गद्य हीं अनादि कालापासून चालत आलेलीं दोन सोइस्कर माध्यमें असतांना गद्यकाव्य किंवा काव्यमय गद्य या तिसऱ्या माध्यमाची जरुरी आहे किंवा काय हा प्रश्न उद्भवतो. माझ्या मतें हा प्रश्न अनाठायीं आहे.

गद्यांतून सर्व काहीं व्यक्त करणें शक्य असतां काव्याची जरूरी काय, या टॉल्स्टॉयनें उपस्थित केलेल्या प्रश्नाप्रमाणेंच याही प्रश्नाला उत्तर देणें कठीण नाहीं. विशिष्ट तऱ्हेची प्रतिभा ज्याप्रमाणें छंदोमय रूपच धारण करते, त्याचप्रमाणें एखाद्या तिसऱ्याच प्रकारच्या प्रतिभेला गद्यगीतांतूनच प्रकट होतां आलें तर तिनें तसें स्वरूप कां धारण करूं नये ? तेव्हां ‘ गद्यगीत ’ हा वाङ्मयप्रकार असावा किंवा नसावा, असा प्रश्न उपस्थित न करतां, असल्यास तो कसा असावा किंवा त्याचे विशेष काय असावेत, याचाच विचार करणें योग्य.

‘ गद्यगीता ’ ला काव्याच्या खालीं आणि साध्या गद्याच्या वर, असें मधलें स्थान द्यावें लागेल, असें मला वाटतें. डिकन्स् किंवा पु. य. देशपांडे यांच्या उत्कृष्ट गद्याच्या कांहीं उदाहरणाचा विचार करतांना आपण पाहिलेंच आहे कीं, छंदोमय रचना सोडून दिली तर काव्यांत प्रतीत होणारी भावनोत्कटता आणि तिच्या अनुषंगानें येणारें अल्पाक्षर–बव्हर्थत्व आणि सूक्ष्म तालबद्धता, हे विशेष त्या गद्यांत आढळतात. गद्यगीताला हीच कसोटी लावून त्याच्या यशाचें मापन करतां येईल, असें माझें मत आहे. मात्र हा प्रकार हाताळणारांना एक धोक्याची सूचना द्यावीशी वाटते. छंदाचीं बंधनें तोडून गद्याचें स्वातंत्र्य उपभोगणें आणि त्याबरोबरच काव्य निर्मिण्याचें श्रेय घेणें, हा मोका दिसावयाला मोठा मोहक आहे खरा; पण त्यांत भीति एवढीच आहे कीं, धड काव्यांतलें नाजूक सौंदर्य नाहीं आणि धड गद्याचा मर्दानी कसदारपणा नाहीं, असें होऊन तिसराच अनुचित वाङ्मय–प्रकार निर्माण व्हावयाचा !

मराठी वाङ्मयांत गद्यगीताचा हा नवीन प्रकार सुरू करण्याचें श्रेय श्री. शशांक आणि श्री. शंकर साठे यांना आहे. श्री. शशांक यांनीं ‘मालती’ नांवाचा आपला काव्यसंग्रह आणि ‘ शशिकला, ’ ‘ त्याग ’ इत्यादि गद्यपद्यात्मक नाटिका प्रसिद्ध केल्या आहेत. त्यावरून मराठी गद्य किंवा पद्य ते किती सफाईनें लिहूं शकतात, याबद्दल कुणाचेंही दुमत होणार नाहीं. ‘मालती’चे प्रस्तावनाकार श्री. प्र. के. अत्रे यांच्या शब्दांत सांगा-

वयाचें म्हणजे त्यांच्या लेखनशैलीची "अंगलट रेखीव, सडपातळ व आटोपशीर आहे. तिची रसवंती फार मंजूळ व मिठास आहे."

गद्यगीतलेखकाला या मंजुळ व मिठास भाषाशैलीची अत्यंत आवश्यकता असते. 'मरीचिकें-' तील कुठलेंही गद्यगीत चाळून पाहिलें, तर वाचकाला या मिठास भाषाशैलीचा अनुभव चाखतां येईल. बाराव्या मरीचिकेंतील निशाशशीच्या प्रेमाचें वर्णन पहा—"......निशेच्या निळ्या महालांत येऊन शशीनें रोज तिचें नवनव्या कलांनी रंजन करावें...... अचपळ निशाक्षी हरिणेंही गानलुब्ध होऊन अनिमिष नेत्रांनी शशीकडे पहात. त्याच्या गायनानें शिला पाझरूं लागत, वायु पांगळून जाई; वेगानें धावणाऱ्या सरितांचे प्रवाह तुम्बून पाणी तटांत मावेनासें होई..."

गद्यकाव्यलेखकाला अत्यंत आवश्यक असलेली भावनोत्कटताही श्री. शशांकांत भरपूर आहे. "...वर्षभर कुटुंबांतील साऱ्या लहानथोर व्यक्तींच्या साहाय्यानें त्यानें अत्यंत परिश्रम करून जे शेत पिकविलें, आपल्या रक्ताचें पाणी शिम्पून जें शेत वाढविलें, त्याची आज मळणी होऊन मोत्यांची रास खळ्यांत पडली होती......सावकारानें सारें धान्य जप्त करून नेलें...रिकाम्या खळ्यांत आनंदानें खेळणाऱ्या अजाण बालकांना पाहून त्याची कंबरच खचली,... त्याच्या नेत्रांतून रक्ताश्रु ठिबकले, ..." हें सतराव्या मरीचिकेंतील शेतकऱ्याचें वर्णन कुणाचेंही अंतःकरण पिळवटून टाकील. 'मरीचिकें-' त अशीं वर्णनें ठिकठिकाणीं आहेत. पण नुसत्या भावनोत्कटतेनें प्रतिभाशाली काव्य निर्माण होत नाहीं. प्रतिभा अपूर्ववस्तुनिर्माणक्षम किंवा नवनोन्मेषशालिनी पाहिजे. तशी असेल तरच ती प्रतिभा!

शेलेसारख्या महाकवीच्या प्रेमकाव्यांत आणि दुसऱ्या एकाद्या सामान्य कवीच्या प्रेमकाव्यांत फरक असतो तो, एकांत उत्कट प्रेमभावना असते आणि दुसऱ्यांत नसते, हा नव्हे. दोघांचीही भावनोत्कटता सारखीच असते. भावना तीच, पण सामान्य कवि ठराविक शब्दांत, सांकेतिक कल्पनांनीं नटवून ती व्यक्त करतो. त्याच भावनेनें उफाळलेली शेलेची प्रतिभा नव-नवीन कल्पना प्रसवूं लागते, अपूर्व कल्पनाचित्रां (Images)-

चें मोहजाल विणूं लागतें आणि आपल्या नवनवोन्मेषांनीं रसिकांना दिपवून टाकते. श्री. शशांकांचें वर उल्लेखिलेलें शेतकऱ्याचें चित्र हृदयद्रावक आहे, यांत शंका नाहीं; पण त्यांत अपूर्व असें कांहीं वाटत नाहीं. त्यांची प्रतिभा नवीन कल्पना प्रसवूं शकत नाहीं, असें नाहीं. "...मेदिनीला ग्रासण्याकरितां क्षितिजाकडून अंधकार अजगरासारखा हळूहळू येत होता,..." ही दुसऱ्या मरीचिकेंतली कल्पना बहारीची आहे; पण अशा सुंदर, अपूर्व कल्पनांचा अभाव 'मरीचिके'त तीव्रतेनें जाणवतो.

या मौलिकतेच्या अभावाचें कारण कदाचित् असें असूं शकेल. रवींद्रनाथ टागोरांची गीतांजली, धी गार्डनर इत्यादि इंग्रजी गद्यगीतांचीं पुस्तकें वाचून श्री. शशांकादि लेखकांनीं ही गद्यगीतांची प्रथा महाराष्ट्रांत प्रथम आणली; पण टागोरांच्या बाबतींत एक गोष्ट विसरतां कामा नये. टागोर हे कांहीं गद्यगीत—लेखक नव्हत. टागोरांचें मूळ बंगाली काव्य छंदोबद्ध आहे. केवळ भाषांतराकरितां म्हणून त्यांनीं इंग्रजी गद्याचा अवलंब केला; गद्यगीतें लिहिण्याकरितां नव्हे. अर्थात् टागोरांच्या इंग्रजी भाषेवरील अनुपम प्रभुत्वामुळें आणि जवळजवळ मुळांतल्या इतक्याच भावनोत्कटतेनें त्यानीं हीं भाषांतरें केल्यामुळें नुसती बंगाली पद्यांचीं इंग्रजी भाषांतरें म्हणून नव्हे, तर उत्कृष्ठ गद्यगीतें म्हणून सुद्धां तीं पहिल्या प्रतीचीं ठरलीं ही गोष्ट वेगळी. वॉल्ट् व्हिट्मन्प्रमाणें टागोरांची प्रतिभा सहजस्वभाव म्हणून गद्यगीताचें माध्यम निवडीत नाहीं.

मराठींतल्या गद्यगीतांची अशी विचित्र स्थिति आहे कीं, तीं स्वतंत्र गद्यगीतें म्हणून लिहिलीं गेलीं आहेत, भाषांतरें म्हणून नव्हे. पण तीं लिहिणाऱ्या श्री. शशांकासारख्या लेखकांच्या स्फूर्तीचा उगम प्रत्यक्ष जीवनानुभवांत नसून टागोरांच्या पुस्तकांत आहे. जीवनाच्या प्रत्यक्षानुभवानें उत्स्फूर्त झालेली प्रतिभा गद्य अगर पद्य माध्यम टाकून दुरतिक्रम स्वभावनियमानें गद्यगीत या तिसऱ्याच माध्यमांतून व्यक्त झाली, असा प्रकार त्यांच्या बाबतींत झालेला नाहीं. आपल्या बंगाली काव्याचें इंग्रजी गद्यांत भाषांतर करतां टागोरांच्या हातून न कळत घडलेल्या मोहक गद्यगीतांचें अनुकरण म्हणून त्यांनीं गद्यगीतें लिहिलीं आहेत. त्यांत मौलिक कल्पनाचित्रें

( Images ) किंवा जिवंत वातावरण दिसत नाहीं, त्याचें कारण हेंच. स्फूर्ति उसनी असल्यामुळें त्यांतलें वातावरणही उसनें, बव्हंशी संस्कृत वाङ्मयांत वाचलेलें, प्रत्यक्षानुभवाशीं–वर्तमानकालाशीं असंबद्ध, भूत-कालीन–मध्ययुगीन आहे. ' मरीचिकें–' तल्या युवती कांचनमेखला परि-धान करून गजगतीनें पावलें टाकीत–सुवर्णमंदिरांत डुलक्या खात पडलेल्या देवाधिदेवाच्या दर्शनाला जातात;—फुलपाखरांच्या रंगांचीं पातळें नेसून मलबारहिल्वर किंवा अपोलो बंदराबर त्या फिरावयाला जात नाहींत. डामरी रस्त्यावरून ट्रॅम किंवा मोटारमध्यें बसून तेथले नागरीक फिरत नाहींत;—ते केशरकस्तूरिकेचे सडे टाकलेल्या रस्त्यांवरून खांद्यावरलीं दुकूलें सावरीत आणि कर्णसंपुटांतली कुंडलें हालवीत हळूहळू राजप्रासादाकडे जातात. ' मरीचिके–'चें जग, प्रतिमालेखन करीत काल-क्षेप करणाऱ्या मृगाक्षी, वर्तिकेच्या मंद प्रकाशांत ग्रंथ पठन करणारे वृद्ध द्विज, तपोवनांत दुड्दुड् उड्या मारणारीं हरिणशावकें इत्यादिकांनीं गजबजलेलें आहे.

स्फूर्ति उसनी असेल, पण मराठी वाङ्मयक्षेत्रांत एका नव्या वाङ्मय-प्रकाराचा पाया घालण्याचें महत्त्वाचें कार्य श्री. शशाङ्क यांनी केलें आहे. आणि त्याबद्दल मराठी वाङ्मयाचे चहाते त्यांचे सदैव ऋणी राहतील. गद्यगीताला आवश्यक असलेली नादमधुर, मृदु भाषाशैली आणि अतीव भावनोत्कटता त्यांच्यापाशीं आहे. त्यांच्या शेवटल्या शेवटल्या मरीचिकांत त्यांची स्फूर्ति स्वतंत्र होत चालल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. त्यांची स्फूर्ति जसजशी प्रत्यक्षानुभवाधिष्ठित आणि अधिकाधिक स्वतंत्र होत जाईल, तसतशीं त्यांच्या हातून उत्तरोत्तर सरस गद्यगीतें निर्माण होतील, यांत शंका नाहीं.

# कलेकडून क्रांतीकडे : : १३

नाहीं नाहीं म्हणतां मीं बऱ्याच प्रस्तावना लिहिल्या असतील; पण कालवश झालेल्या एका नवजवान क्रांतिकारकाच्या काव्य-संग्रहाला प्रस्तावना लिहितांना मला अपरिमित अभिमान वाटतो. कॉमरेड सोहोनी यांच्या कार्याला प्रणाम करण्याची ही संधि मला दिल्याबद्दल त्यांच्या पत्नीचा आणि इतर नातेवाइकांचा मी आभारी आहें. सोहोनी यांच्या या कविता वाचतांना वाचकांनीं हीच गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची आहे. दलितांबद्दल सहानुभूति व्यक्त करणाऱ्या, नव्या मनूच्या ललकाऱ्या देणाऱ्या आणि क्रांतीचा उदो उदो करणाऱ्या पुष्कळ कविता वाचकांनीं वाचल्या असतील. कवींचीं क्रांतिविषयक गीतं पुष्कळांच्या वाचनांत आलीं असतील. इथें क्रांतिकारकाच्या—क्रांतीसाठीं आत्मसमर्पण करणाऱ्याच्या—कविता वाचकांना वाचावयाला मिळणार आहेत.

सोहोनींच्या कविता वाचतांना आणि वाचल्यानंतर माझ्या डोळ्यासमोर एक प्रश्न ढळढळीतपणें उभा राहतो. अवघ्या एकोणतीस वर्षांच्या आयुष्यांत—म्हणजे जेव्हां याहीपेक्षां चांगल्या आणखी किती तरी कविता लिहावयाला सुरवात करावयाची त्यापूर्वीच—हा लेखक बऱ्याचशा कविता लिहितो, नंतर लेखन सोडून देतो आणि क्रांतिकारक राजकारणाच्या संगरांत उडी घेतो—त्यासाठीं स्वतःचें बलिदान करतो—हें कसें काय? लेखक, कवि, कलावंत अलीकडे राजकारणाकडे, क्रांतीकडे झपाट्यानें कां

झुकत आहेत? कुठेंही पहा, तुम्हांला हेंच दृश्य दिसेल. रोमाँ रोलाँ, आन्द्रे जीड यांच्यासारखे मोठमोठे युरोपियन लेखक, वाल्डो फ्रँक, थिओडोर ड्रायजर यांच्यासारखे थोर अमेरिकन कादंबरीकार आतां उतार-वयांतही क्रांतीचे पुरस्कर्ते झाले आहेत. क्रांतीचा संदेश घरोघरीं पोंहोचत नाहीं तोंपर्यंत ‘ I will not rest ’ ( रोमाँ रोलाँ ) अशा गर्जना करीत आहेत. फार दूर कशाला, पांढरपेशाच्या सुखदुःखापलीकडे अजून-पर्यंत ज्यांनी पाहिलें नव्हतें असे आमचे खांडेकर, फडकेदेखील बहुजन-समाजाचीं दुःखें समजून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत, आपल्या कला-कृतींत तीं आणण्याकरितां तळमळत आहेत. या सर्व तळमळीचें आणि धडपडीचें कारण एकच. विषमतेवर आधारलेल्या, मानवी जीवन असह्य करून टाकणाऱ्या या जुन्या जगाचा पाया हादरतो आहे; मानवांना विशाल जीवन जगूं देईल असें नवें जग जन्माला येऊं पाहत आहे. आपण क्रांति-कालांत आहोंत. जीवनाचाच पाया हादरतो आहे—जीवनच नवें स्वरूप धारण करूं पाहतें आहे; मग जीवनांतूनच जिचा जन्म झाला, जीवन नसेल तर जी असूंच शकत नाहीं त्या कलेनें तळमळूं नये, तडफडूं नये, धडपडूं नये तर काय करावें ?

कलावंत हा सामान्य माणसापेक्षां कितीतरी पटीनें अधिक संवेदनक्षम असतो. जुन्या जगाच्या वेदना आणि नव्या जगाच्या हाका साहाजिकच कलावंतांना अधिक लवकर, अधिक जिव्हाळ्यानें प्रतीत होत आहेत. आणि अर्धवट, कच्च्या दिलाचे कलावंत या क्रांतिकाळांत गडबडलेले, भांबावलेले, किंकर्तव्यमूढ झालेले, स्वतःच्याच शिळ्या कल्पनांचें चर्वित चर्वण करीत असलेले, फार काय, युरोपांतल्याप्रमाणें आत्महत्येला प्रवृत्त झालेले किंवा इथल्या कांहींप्रमाणें वेडे किंवा गूढवादी झालेले दिसत असले, तरी प्रभावी प्रतिभेचे थोर कलावंत या आगामी क्रांतीला आपापल्या परीनें हातभार लावण्याचा निकराचा प्रयत्न करीत आहेत. या धडपडींत त्यांच्या कलेची थोडीशी हानि होत असेल, प्रचाराचें अवजड दडपण तिच्यावर पडत असेल, तिचा नाजूक बांधा थोडासा राकट होत असेल; पण ती अधिक जीवनाभिमुख, अधिक व्यापक, अधिक विशाल होते

आहे यांत शंकाच नाहीं. धर्म, नीति, संस्कृति इत्यादि सर्व गोष्टीं-प्रमाणेंच कलेचीही अंतिम कसोटी ती नाजूक आहे कीं राकट आहे, ती सुंदर आहे कीं कुरूप आहे, यावर नसून ती जीवनाला कितपत पोषक आहे यावरच आहे. लेखनाकडून राजकारणाकडे, कलेकडून क्रांतीकडे वळतांना कलावंत आपल्या कलेची थोडीबहुत हानि करीत असतील; पण याबद्दल त्यांना दोष देण्याऐवजी भावी विशाल जीवनासाठीं आणि विशालतर कलेसाठी या संक्रमणकालांतल्या कलावंतांनी केलेला हा एक अलौकिक स्वार्थत्याग समजून आपण त्यांचे आभारच मानले पाहिजेत. कांही तरुण शूर कलावंत कलेकडून नुसते क्रांतीकडे वळले; इतकेंच नव्हे तर क्रांतीसाठी त्यांनी आत्मसमर्पण केलें. रॅल्फ फॉक्स, ख्रिस्तॉफर कॉड्वेल हे तरुण लेखक लेखणी टाकून स्पेनच्या रणभूमीवर उतरले आणि क्रांतीसाठी लढतां लढतां त्यांनी धारातीर्थी देह ठेवले. कॉमरेड सोहोनी हेही 'फुंकूं या अंगार' ही कविता करतां करतां क्रांतिकारक चळवळींत पडले आणि शेवटी गोकाकच्या मजुरांसाठीं लढतांना तुरुंग-वास भोगून क्रांतिचरणीं त्यांनी स्वतःचें बलिदान दिलें. राजाच्या मृत्यू-नंतर इंग्रजींत जें म्हणतात त्यांत थोडासा फेरफार करून आपण म्हणूं या, कीं ' क्रांतिकारक सोहोनी मृत झाले, क्रांति चिरायु होवो ! '

---

# आमचें टीकाशास्त्र : : १४

प्रस्तावनालेखकानें जें करूं नये तें मी या प्रस्तावनेंत करणार आहें. पुस्तकांत जें कांहीं असतें तें प्रस्तावनेंत दाखवून द्यावयाचें असतें. या पुस्तकांत काय नाहीं, किंवा काय असायला पाहिजे होतें, तें माझ्या मगदुराप्रमाणें सांगण्याचा मी इथें प्रयत्न करणार आहें. स्वतःचें समर्थनच करावयाचें असेल तर मला एक मुद्दा पुढें करतां येईल. स्वतंत्र किंवा मौलिक पुस्तकांत काय आहे तें सांगणें किंवा रसग्रहणात्मक प्रस्तावना लिहिणे ठीक आहे; पण मौलिक किंवा स्वतंत्र वाङ्मयावरली टीकाच ज्या पुस्तकांत आहे त्या पुस्तकाची प्रस्तावना रसग्रहणात्मक असण्यापेक्षां टीकात्मक असणें अधिक योग्य नाहीं काय ?

ह. वि. देसाई यांचें मराठी आणि इंग्रजी वाङ्मयाचें वाचन आणि या विषयासंबंधीं त्यांना वाटणारा उत्साह खरोखरच दांडगा आहे. त्यांनीं वाचलेल्या इंग्रजी आणि रशियन लेखकांची या पुस्तकांत ठिकठिकाणीं आढळणारी नामावलि वाचून कुणालाहि कौतुक वाटेल. गेल्या तीनचार वर्षांत मराठी वाङ्मयसृष्टींत जे नवीन नवीन वाद आणि विचारप्रवाह उपस्थित झाले, त्यांचा निरनिराळ्या नियतकालिकांतून देसाई यांनीं वेळोवेळीं परामर्श घेतला होता. हे सर्व लेख ‘ साहित्यांतील विचारप्रवाह ’ या नांवानें पुस्तकाच्या पहिल्या भागांत दिले आहेत. या कालखंडाचा इतिहास अभ्यासूं पहाणाऱ्याच्या दृष्टीनें हा भाग अत्यंत उपयुक्त आहे.

दुसऱ्या ‘ रसग्रहण ’ या भागांत मुख्यत्वें करून, पर्ल बक्, अर्न्स्ट टॉलर इत्यादि जागतिक कीर्तीच्या परदेशी साहित्यिकांची ओळख करून दिली आहे. या भागात दिलेली उपयुक्त माहिती जमविण्याकरतां लेखकाला किती श्रम पडले असतील याची कल्पना हा उद्बोधक भाग वाचल्याशिवाय येणार नाही.

‘ कला आणि प्रचार ’ या पहिल्याच लेखांत प्रो. फडके यांच्या “ ...प्रचार हें वाङ्मयाचें ध्येय नसून, पुनःप्रत्ययाचा आनंद हेंच आहे... ” या विधानावर देसाई यांनी जोराचा हल्ला चढविला आहे. ललित वाङ्मयांत प्रचार असू शकतच नाही असें प्रो. फडके यांचें एकांतिक मत कधीं काळीं असल्यास त्या मताचें सहज खंडन करतां येण्यासारखें आहे; आणि पुनःप्रत्ययाचा आनंद देणाऱ्या वाङ्मयापेक्षांही नव्या प्रत्ययाचा आनंद देणारें वाङ्मय अधिक मोठ्या दर्जाचें असतें, असेंहि म्हणतां येईल. पण फडक्यांच्या ज्या लेखांतल्या उताऱ्यांवर देसाई तुटून पडले आहेत त्या लेखांत प्रो. फडके यांनी निर्भेळ कलावादी मत व्यक्तत्र केलेलें दिसत नाही. गटेबद्दल लिहितांना ते म्हणतात, “...भोंवती घडणाऱ्या राजकीय, धार्मिक व इतर घटनांशी संवादित्व ठेवणाऱ्या या सहृदय कवीनें तद्विषयक प्रश्नाचा आपल्या ‘ फाउस्ट ’ काव्य नाटकांत कितीसा उहापोह केला ? जवळ जवळ मुळींच नाही....” म्हणजे भोंवतीं घडणाऱ्या सामाजिक, राजकीय घटनांशी लेखकानें संवादित्व ठेवलें पाहिजे हें फडक्यांना मान्य आहे हें उघड आहे. ललित वाङ्मयांत त्यांना या प्रश्नाची नीरस चर्चा किंवा उघडा नागडा प्रचार नको. ललितवाङ्मयाचा प्रधान हेतु जीवनाचा ‘ पुनः ’ म्हणा किंवा ‘ नवा ’ म्हणा, प्रत्यय देणें हा आहे आणि कसलाही सामाजिक किंवा राजकीय प्रचार हा अपरिहार्य पण गौण हेतु आहे, हें देसाई यांना कबूल नाही काय ? देसाई यांनींच उद्धृत केलेलीं प्रो. फडके यांचीं वाक्यें मी देतों. फडके म्हणतात, “ ......कादंबरींत, नाटकांत अगर लघुकथेंत कोणत्याही तत्त्वांचें प्रतिपादन कधींहि असूं नये असें कोणींच म्हणत नाहीं... ललित वाङ्मयांत सौंदर्यविकास घडतां घडतां आणि आनंदनिर्मिति होतां

होतां तत्त्वप्रतिपादन पुष्कळदां सहजासहजीं केलें जाईलही. पण सौंदर्याचा भंग न होतां!...". देसाई यांचा यावर काय आक्षेप आहे? ललित वाङ्मयांत मुख्यत्वेंकरून सौंदर्यविकास नसावाच? सौंदर्याचा खून झाला तरी बेहत्तर, पण प्रचार, तत्त्वप्रतिपादन करावेंच? तसा त्यांचा आक्षेप दिसत नाहीं. कारण तेच पुढल्या पानावर म्हणतात, ललित वाङ्मयांत कलेला दुय्यम स्थान दिलें पाहिजे, असें कुणीच प्रतिपादन केलेलें नाहीं. कलेला दुय्यम नव्हे प्रधान स्थान दिलें पाहिजे, म्हणजेच प्रचाराला दुय्यम स्थान दिलें पाहिजे, असें देसाई म्हणतात. आणि कला किंवा सौंदर्यविकास हाच ललित वाङ्मयाचा प्रधान हेतु,–तत्त्वप्रतिपादन वा प्रचार हा गौण हेतु, असें प्रो. फडके म्हणतात. म्हणजेच प्रो. फडके आणि देसाई यांच्यांत काडीइतकाहि मतभेद नाहीं.

मग प्रो. फडके यांच्यावर देसाई इतक्या हिरिरीनें तुटून कां पडले? स्पष्टपणें बोलावयाचें म्हणजे कला, प्रचार, तत्त्वप्रतिपादन, चालू परिस्थिति इत्यादि शब्द वापरतांना स्वतःच्या मनांत काय आहे, हें देसाई यांना स्वतःचें स्वतःलाच समजलेलें नाहीं म्हणून. अमुक वाङ्मय उत्तम, अमुक वाङ्मय अधम, असें जेव्हां टीकाकार म्हणतो, तेव्हां आपण असें कां म्हणतों याची स्पष्ट कल्पना त्याला पाहिजे; नाहीं तर सामान्य वाचक आणि टीकाकार यांच्यांत फरक काय? देसाई यांच्या या बाबतींतल्या असहायतेचीं उदाहरणें या पुस्तकांत ठिकठिकाणीं सांपडतात. 'पुरोगामी वाङ्मय' या लेखांत जोसेफ कॉनरॅड आणि ऑस्कर वाइल्ड यांना एकाच मालिकेंत बसवून कॉनरॅड हा लेखक जुन्या काळची रिकामपणाची कामगिरी किंवा घटकाभर करमणूक करणारा लेखक आहे असें देसाई यांनीं म्हटलें आहे. चुरचुरीत भाषा लिहिणाऱ्या आणि खुसखुशीत कोट्या करणाऱ्या वाइल्डबद्दल कुणाचें कांहीही मत असलें, तरी बऱ्याचशा प्रख्यात इंग्रजी आणि अमेरिकन टीकाकारांच्या मतें कॉनरॅड हा फार मोठा लेखक आहे. मानवी स्वभावाचे अनेक चिरंतन नमुने त्यानें इंग्रजी वाङ्मयांत निर्माण करून ठेवले आहेत. या टीकाकारांच्या बरोबर विरुद्ध देसाई यांचें मत आहे. यावर माझा मुळींच आक्षेप नाहीं. स्वतंत्र मत

व्यक्त करण्याचा त्यांना पूर्ण अधिकार आहे. पण कॉनरॅडला टाकाऊ ठरविण्याकरतां जीं कारणे ते पुढें करतात तीं मात्र और आहेत. समुद्रावर आयुष्य कंठणाऱ्या खलाशांचे जीवन कॉनरॅड रंगवतो म्हणून तो घटकाभर मन रमवणारा, चालू परिस्थितीशीं समरस न होणारा लेखक. जणूं काय खलाशांचें जीवन हा चालू परिस्थितीचा भागच नव्हे! आणि चालू परिस्थितीशीं समरस होणें हीच थोर वाङ्मयाची एकमेव कसोटी की काय? त्या काळच्या परिस्थितीचा ज्यांत यत्किंचित्‌हि पडसाद उठलेला नाहीं अशीं 'Skylark' किंवा 'Ode to the west wind' हीं भावगीते लिहिणाऱ्या शेलेपेक्षा आपल्या पदात खच्चून चालू परिस्थिति भरणारे, दारूबंदीवर किंवा चरख्यावर पदें लिहिणारे आमचे मेळेवाले या कसोटीवर घासून पाहतां खात्रीनें श्रेष्ठ दर्जाचे कवि ठरतील! मात्र देसाई यांचा प्रामाणिकपणा संदेहातीत आहे. 'अक्षर वाङ्मय' या लेखात महाकवि शेक्स्पियरलाही चालू परिस्थितीशीं समरस होण्याची ही जालीम कसोटी लावून टॉल्स्टॉयच्या आधारानें त्यानीं लुततेज ठरविलें आहे. रोमिओ-ज्युलिएट नाटकात प्रणयाची गंगा अखंड वहात असताही 'चालू परिस्थिती'चें प्रतिबिंब त्या नाटकांत नसल्यामुळे आज रसिकांचें (—या रसिकाचा पत्ता काय?—) या वाङ्मयाकडे दुर्लक्ष होत आहे, असें देसाई म्हणतात. शेले किंवा कॉनरॅड यांनी अस्वस्थ व्हावयाचे काहीच कारण नाहीं; त्याना चांगली शेक्सपियरची सोबत आहे!

अर्थात् या लटपटीबद्दल देसाई यांच्यासारख्या तरुण आणि उत्साही टीकाकाराला मी मुळीच दोष देत नाहीं. टीकाशास्त्र नांवाची चीज आजकालच्या मराठी वाङ्मयांत कस्तुरीसारखी दुर्मिळ झाली आहे. मोठमोठ्या इंग्रजी लेखकापेक्षांही आमचे आधुनिक मराठी लेखक कसे श्रेष्ठ आहेत हें सिद्ध करण्याकरितां बर्नार्ड शॉला अचरट, आल्डस् हक्स्लेला थिल्लर आणि लॉरेन्सला कामकर्दमांत रुतलेला अशी विशेषणें बहाल करणारे बहाद्दर आमच्या विश्वविद्यालयांत आणि महाविद्यालयांत जिथें इंग्रजी वाङ्मयाचे मान्यवर प्राध्यापक होऊं शकतात, तिथें कसल्याहि पदवीचें शेपूट न मिरवणाऱ्या बिचाऱ्या देसायांना काय दोष द्यावयाचा?

जातिवंत टीकाकाराजवळ बरें वाईट, कसेंहि, पण स्वतःचें असें कांही वाङ्मयनि तत्त्वज्ञान ( Critical Credo ) पाहिजे,—स्वतःची अशी नक्की, स्पष्ट कसोटी पाहिजे. आपल्या प्रत्येक टीकालेखाच्या सुरवातीला त्यानें एक प्रतिज्ञापत्रक किंवा आपली नियमावलि द्यावी असें मी म्हणत नाहीं; पण त्याच्या एकंदर लिखाणांतून ही कसोटी निदान ध्वनित तरी झाली पाहिजे. आमच्या ज्येष्ठ आणि श्रेष्ठ टीकाकारांच्या टीकालेखांतही असें कांही दिसत नाहीं. परवांच एके ठिकाणी केलेल्या भाषणांत माडखोलकरांनी हरिभाऊ आपट्यांच्या तोडीचा एकहि कादंबरीकार आज महाराष्ट्रांत नाहीं असें विधान केलें. विधान मान्य आहे. पण हरिभाऊंच्या श्रेष्ठतेचें माडखोलकर कारण काय देतात पहा;—महाराष्ट्रीयांचें जीवन किंवा महाराष्ट्राची अस्मिता हरिभाऊंच्या वाङ्मयात जितक्या प्रकर्षानें दिसते तितकी ती आजकालच्या कादंबऱ्यांत दिसत नाही. म्हणजे अमुक एका समाजाच्या जीवनाचें प्रतिबिंब लेखक जितक्या व्यवस्थितपणें आपल्या वाङ्मयांत उठवील, तितका तो लेखक मोठा समजावयाचा की काय? समाजाचें प्रतिबिंब उठवणें हेंच वाङ्मयाचें ध्येय? विशिष्ट जीवन किंवा चालू परिस्थिति आज आहे, उद्यां नाही. मोठा किंवा लहान, प्रत्येक लेखक चालू परिस्थितीचेंच चित्रण करतो. ही गोष्ट अपरिहार्य आहे. ऐतिहासिक कादंबरींतही चालू परिस्थितीचेच पडसाद उठल्याशिवाय रहात नाहीत. पण मोठा लेखक या चित्रणांतून जीवनांतल्या कांहीतरी चिरंतन तत्त्वाचा किंवा सनातन मानवी स्वभावाचा आविष्कार करतो; लहान लेखक नुसतें चित्रणच करतो, त्यामुळें ती विशिष्ट परिस्थिति नाहींशी झाली कीं लहान लेखक विसरला जातो आणि मोठा लेखक शतकानुशतकें टिकतो. विशिष्ट जीवनाचें किंवा चालू परिस्थितीचें फोलपट बाजूला काढून कोणत्या चिरंतन तत्त्वाचा किंवा मौलिक दृष्टिकानाचा गाभा हरिभाऊ आपट्यांत आहे, आणि आधुनिक लेखकांत नाही, हें टीकाकार म्हणून माडखोलकरांनीं सांगावयाला हवें होतें. तें त्यांनीं सांगितलें नाही. आनंदाची गोष्ट एवढीच आहे, कीं टीकावाङ्मयांतल्या या उणीवेकडे साहित्यिकांचें लक्ष आतां वळूं लागलें आहे.

प्रभाकर पाध्ये, बा. सी. मर्ढेकर, वा. ल. कुलकर्णी इत्यादि उदयोन्मुख मराठी टीकाकार वाङ्मयाच्या या मूलभूत प्रश्नांना आत्मविश्वासपूर्वक हात घालूं लागले आहेत. खुशामती किंवा हजामती टीकालेखांचे चणे-कुरमुरे खाऊन वाढलेल्या कांहीं लोकांना 'वास्तववाद आणि स्वप्नरंजन' 'वाङ्मयीन महात्मता आणि मनोविश्लेषण' इत्यादि कसदार खुराकाचें ताट पुढें आल्याबरोबर उचकी लागत असली, तरी वाङ्मयाच्या अभिवृद्धीच्या दृष्टीनें असल्या टीकावाङ्मयाची अत्यंत जरूरी आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. देसाई हेही या दिशेनें प्रयत्न सुरू करतील अशी बळकट आशा मी व्यक्त करतो.

---

# 'प्रकाशांतील व्यक्ति' : : १५

'प्रकाशांतील व्यक्ति' हें श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या पुस्तकाचें नांव वाचल्याबरोबर ' वाङ्मय प्रकाश देतें कीं प्रत्यय देतें ? ' या पाध्ये यांनीं ज्यांत अत्यंत हिरिरीनें भाग घेतला त्या वादाची आठवण होते. वाङ्मयाचे कांहीं प्रकार प्रकाश देतात किंवा आपल्या माहितींत भर घालतात, तर कांहीं प्रत्यय देतात किंवा आपल्या अनुभवभांडाराची वाढ करतात, असा सर्वसाधारणपणें त्या वादाचा निष्कर्ष होता. आणि या दोन प्रकारांत प्रत्यय देणारा प्रकार श्रेष्ठ असें ठरलें. मात्र ' प्रकाशांतील व्यक्ति' या नांवांत ' प्रकाश ' हा शब्द आहे म्हणून या लेखसंग्रहांतील सर्व लेख प्रकाश देणारे आहेत, प्रत्यय देणारे लेख त्यांत नाहींत, हें सिद्ध करण्याकरतां मीं या वादाचा उल्लेख केला, असा कुणीच गैरसमज करून घेऊं नये. पुस्तकाच्या नांवांत ज्या प्रकाशाचा उल्लेख आहे तो कीर्तीचा किंवा प्रसिद्धीचा प्रकाश होय, वाङ्मयांतला नव्हे. राजकारणांत किवा वाङ्मयांत प्रसिद्ध असलेल्या कांहीं व्यक्तींचीं शब्दचित्रें श्री. पाध्ये यांनीं आपल्या भेदक आणि तडफदार लेखणीनें या संग्रहांत रंगविलीं आहेत.

पुस्तक वाचतांना एका विलक्षण विरोधाभासाचें मला कौतुक वाटलें. नेमकी जी व्यक्ति प्रकाशांत नाहीं त्याच व्यक्तीचा पाध्ये यांनीं उत्कृष्ट प्रत्यय आणून दिला आहे. ' विभाकरी शिरूरकर ' ही व्यक्ति अज्ञात

असल्यामुळें तिचा वाङ्मयांत आणि बाहेरचा आपणाला माहीत असलेला पुरावा वकीलाच्या तर्ककर्कश पद्धतीनें पाध्ये पुढें मांडतील आणि तिचें व्यक्तित्व प्रकाशांत आणतील अशीच कुणाचीही समजूत होईल. या व्यक्तिचित्रांत शिरूरकर या व्यक्तीवर पाध्ये यानीं प्रकाश पाडलाच आहे, पण तो इतक्या हळूवार हातांनीं आणि इतक्या कलात्मक रीतीनें कीं विभावरी शिरूरकर म्हणजे कु. बाळुताई खरे ही वाचकांची खात्री होतेच, पण त्या व्यक्तीच्या असाधारण व्यक्तित्वाचा आल्हाददायक प्रत्यय येऊन वाचक तल्लीन होतो. विभावरी वाङ्मयांत जी तेजस्विता आहे ती या विदुषीच्या नावानें प्रसिद्ध होणाऱ्या इतर लेखांत कां दिसत नाही, या प्रश्नाला पाध्ये यांनीं अत्यंत समर्पक उत्तर दिलें आहे. "...विभावरी-वाङ्मय म्हणजे या विदुषीच्या स्वतःच्या आयुष्यांतील दुःखमय, निराश, असंतुष्ट अवस्थांचा आविष्कार आहे असें मला वाटतें, व तसा आविष्कार तिच्या इतर लेखनांत होत नसल्यानेंच विभावरी–वाङ्मयाची तेजस्विता त्यांत प्रतीत होत नाहीं, अशी माझी समजूत आहे..."

पाध्ये हे एक प्रखर बुद्धीचे, तर्ककर्कश गृहस्थ आहेत, तेव्हां त्यांच्यांत सहृदयता कमी असावी, अशी एक समजूत आहे व म्हणूनच विभावरी-वरल्या या लेखाचा मी इतक्या विस्तारानें उल्लेख करतों आहें. पाध्यांच्या सहृदयतेचा हा लेख एक उत्कृष्ट नमुना आहे. या लेखाची भाषाही अत्यंत लालित्यपूर्ण आणि निर्दोष आहे. पाध्ये यांची लेखनशैली आवेशपूर्ण, तर्कशुद्ध, जोमदार असली तरी खडबडीत आहे असें प्रस्तावनाकार प्रो. कुळकर्णी यांनीं म्हटलें आहे. त्यांतला खडबडीतपणाचा आरोप हा लेख वाचून तरी मला पटत नाहीं. त्यांच्या लेखनांत कुठें कुठें खडबडीतपणा येतो, पण तो कां येतो त्याचें निदान मी शेवटीं करणार आहें.

विभावरीप्रमाणेंच प्रो. वामन मल्हार जोशी आणि प्रो. ना सी. फडके यांचींही व्यक्तिचित्रें श्री. पाध्ये यांनीं मोठ्या सहृदयतेने रंगविलीं आहेत. या दोघांचे विलोभनीय व्यक्तिविशेष आणि वाङ्मयविशेष त्यांनीं दाखविले आहेतच, पण लोक त्यांच्यामध्यें जे दोष आहेत असें म्हणतात तेहि मुळांत कसे गुणच आहेत हेंही त्यांनीं आपल्या नेहमींच्या आवेशपूर्ण

पद्धतीनें सिद्ध करून दाखविलें आहे. वामनरावांचा सर्वांनी उपहासिलेला ' संदेहवाद ' हा खरोखर ' यांत काय आहे, त्यांत काय आहे,' असें समजणारा ' निरर्थवाद ' नसून सदैव सत्यसंशोधनांत आनंद मानणाऱ्या सार्थवादी तत्त्वज्ञान्याचा तो दृष्टिकोण आहे हे किती समर्पक रीतीनें त्यांनी दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणें एकदां असहकारितेंन उत्साहानें उडी घेऊन नंतर राजकारणांतून हळूच अंग काढून घेतल्याबद्दल प्रो. फडके यांना पुष्कळ लोक नांवें ठेवतात. पण पाध्ये यांनी एकदां एखाद्याला ' हीरो ' केला, की मग ते आपल्या ' हीरो ' विरुद्ध कुणाची लटपट चालू देणार नाहीत. प्रो. फडके यांच्या उपरोक्त कृत्यांचें समर्थन करतांना पाध्ये म्हणतात, "...ध्येयें ही दिवास्वप्नेच आहेत, निकोप प्रकृतीची कांहीं तीं लक्षणें नव्हत, याची अंधुक ओळख तेव्हां त्यांना पटली असावी. निदान हा ध्येयवाद आपल्या जीवनोत्सुक वृत्तीला मानवणारा नाही याची त्यांना खात्री पटली असावी..."

एकाद्या व्यक्तीविषयीं एकदा अनुकूल मत झालें कीं, पाध्ये तिची भरमसाट स्तुती करतात आणि कांहीं काळानें त्याच व्यक्तीविषयीं प्रतिकूल मत झालें कीं तिच्यावर निर्दय टीकेचे प्रहार करतात, असा पाध्ये यांच्यावर पुष्कळांचा आरोप आहे. दिसावयाला असें दिसतें खरें. पण मला वाटतें त्यांच्यांत जे दोन गुण आत्यंतिकतेनें वास करीत आहेत, त्या गुणांतच या दोषाचा उगम आहे. आपल्या अंगीं असलेल्या जन्मजात सहृदयतेच्या एकदां ते आहारीं गेले, मग लक्ष्य वस्तूच्या गुणाखेरीज त्यांना कांही दिसेनासें होतें; आणि आपल्या तिखट बुद्धिमत्तेच्या प्रभावाखालीं ते असले कीं दयामाया त्यांना कांहीं सुचत नाही. सहृदयता आणि बुद्धि यांचें प्रमाणशीर मिश्रण झालें म्हणजेच प्रतिभेला परिपक्वता येते; आणि अशा प्रतिभेनें निर्मिलेल्या कृतींत एक प्रकारचें माधुर्य निर्माण होतें. श्री. पाध्ये यांच्या लिखाणांत कित्येक ठिकाणीं हिरवटपणा आढळतो असें जें टीकाकार म्हणतात, त्याचा उगम पाध्यांच्या या अशा एकेरीपणांत आहे. मात्र कुणावर स्तुतीचा वर्षाव करतांना ते एकेरीवर आलेले असोत, वा टीकेचे प्रहार करतांना एकेरीवर आलेले असोत, त्यांचा प्रामाणिकपणा

अविवाद्य आहे. कुणाची खुशामत करण्याकरतां ते स्तुती करीत नाहींत-त्यांची सहृदयता त्या वेळेला त्या व्यक्तीचे गुणच दाखवीत असते. त्याच; प्रमाणें टीकेचे प्रहार करतांनाही त्यांच्या मनांत लवमात्र दुष्टावा नसतो; त्या वेळेला त्यांच्या बुद्धीच्या प्रखरतेंत त्यांची सहृदयता पार वितळलेली असते.

केळकर आणि फडके यांच्यावरले दोन लेखच उदाहरणार्थ घेऊं. फडके यांच्या राजकारणनिवृत्तीचें समर्थन त्यांनीं किती हळूवारपणें आणि सहृदयतेनें केलें आहे. पण केळकरांच्या आयुष्यांतल्या अशाच एकाद्या प्रसंगावर लिहावयाचें असतें तर ढोंगी, तत्त्वशून्य, संधिसाधु आणि याहीपेक्षां भयंकर विशेषणांचा मारा करून तात्यासाहेबांचे त्यांनीं लचके तोडले असते. त्याच कृत्यांचा किंचित् सहानुभूतीपूर्वक विचार करून केळकरांच्या बाजूनें कांहीं बोलतां येईल किंवा काय असा विचारही त्यांना चाटून गेला नसता. केळकरांवरल्या त्यांच्या लेखांतून अशीं कितीतरी उदाहरणें काढून दाखवितां येतील. १९३२ सालीं केळकरांचा ६१ वा वाढदिवससमारंभ त्यांच्या चहात्यांनीं साजरा केला. हजारों सत्याग्रही स्त्रीपुरुष तुरुंगांत जात असतां असा समारंभ केळकरांनीं करून घेणें अनुचित झालें अशी टीका बऱ्याच लोकांनीं केळकरांवर केली. ‘ हा प्रसंगयोग आणि समारंभाचें हें प्रमाण या दोन्हीही गोष्टी माझ्या हातच्या नव्हत्या. १९३२ सालींच माझ्या वयाचीं साठ वर्षें पुरीं झालीं याला माझा काय उपाय ? ’ असा जबाब केळकरांनीं या टीकेला दिला आहे. त्याचप्रमाणें आपण या उत्सवाला निकरानें हरकत घेतल्याचेंही ते सांगतात. पण पाध्ये या गोष्टी ऐकायला मुळींच तयार नाहींत. ते म्हणतात, “ ...६१ वा वाढदिवस-समारंभ म्हणजे कांहीं व्रतबंधविधि नव्हे, कीं ज्याच्या अभावीं केळकरांना कुणाही सुब्राम्हणानें आपली कन्या अर्पण करावयाचें नाकारलें असतें !...” आपण ‘ नको नको ’ म्हणत असतां आपणावर आपल्या चहात्यांनीं हा समारंभ लादला असा एकादा माणूस काकुळतीला येऊन सांगत असतां वरीलप्रमाणें त्याच्यावर टीका करणें अन्याय्य नसलें तरी निर्दय खास आहे. खाडिलकरांनीं आपल्या एकसष्टीला निकराची हरकत

घेतली आणि ती यशस्वी झाली; मग केळकरांची कां झाली नाहीं, असा प्रश्न विचारून केळकरांना तो समारंभ मनांतून हवाच होता असें अकारण क्रूर होऊन पाध्ये सुचवतात. खाडिलकर तिरसट, तापट, वागण्यांत थोडेसे जंगली आहेत हें सर्वांना माहीत आहे. तेव्हां लोकांची मनें मोडणें त्यांना कठीण वाटलें नसेल. केळकर अतिशय भिडस्त असतील. तेव्हां हजारों चहात्यांची मनें दुखवणें त्यांच्या जीवावर आलें असेल. पाध्यांना आवडो अगर न आवडो, महाराष्ट्रांत केळकरांचे कांहीं लाख नसले तरी कांहीं हजार चहाते खास आहेत. खाडिलकरांच्या ' जंगली–' पणाची हेटाळणी किंवा केळकरांच्या भिडस्त-पणाचें समर्थन करण्याचा माझा मुळीच उद्देश नाहीं. पण एखाद्याचा विशिष्ट प्रकारचा स्वभाव आहे हें लक्षांत घेऊन त्याचें म्हणणें सहानु-भूतीनें ऐकण्याऐवजीं त्याच्या म्हणण्यावर विश्वास ठेवण्याचें हिरिरीनें नाकारावयाचें याचा अर्थ काय! आपणाला अगदीं मनापासून नको असलेल्या किती तरी गोष्टी केवळ भिडेला बळी पडून दुसऱ्याना बरें वाटावें म्हणून आपण करीत नाहीं काय? पुष्कळ वेळां एकप्रकारचा ' जंगली–' पणा हें मोठेपणाचें लक्षण असतें, आणि भिडस्तपणा मनाचा कमकुवत-पणा दाखवतो हें मी कबूल करतों. पण असले किरकोळ दोष माणसा-च्या स्वभावांत असणें हा कांहीं घोर गुन्हा नव्हे. जगाचा जसजसा अधिकाधिक अनुभव येत जाईल तसतशी पाध्यांच्या तर्ककर्कशतेला सहृदयतेची सदैव जोड मिळत जाऊन त्यांच्या तथाकथित हिरवटपणाला परिपक्वतेचें रूप येईल यांत शंका नाहीं.

पाध्ये यांच्या लेखनशैलींत कुठेंकुठें जो खडबडीतपणा दिसतो त्याचें मला विशेष कांहीं वाटत नाहीं असें मीं सुरुवातीला म्हटलें त्याचें कारण सांगतों. हा खडबडीतपणा नैसर्गिक किंवा स्वभावसहज नसून भलत्याच मोहाला बळी पडल्यामुळें पाध्यांनी जवळ जवळ ओढून ताणून आणला आहे असें माझें म्हणणें आहे. आणि म्हणूनच त्यांना तो सहज काढून टाकतां येण्यासारखा आहे. खांडेकर, माडखोलकर यांचे कांहीं वर्षांपूर्वी पाध्यांशीं निकट स्नेहसंबंध होते, आणि त्यांच्या लेखनशैलीची पाध्यांवर फार दाट छाप

पडली होती. सुंदर भाषा लिहावयाची म्हणजे उपमा, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांनीं ती नटलेली पाहिजे, अशी पाध्यांनी स्वतःची समजूत करून घेतली.हें अलंकारप्राचुर्य खांडेकर माडखोलकरांना अमदीं नैसर्गिक रीत्या, सहजासहजीं साधतें,म्हणून त्यांची भाषा सुंदर वाटते;पण तीच गोष्ट पाध्ये त्यांना स्वभावसहज नसल्यामुळें आणि त्यांनी ती ओढून ताणून आणल्यामुळें रसिकमनाला एकदम खटका देते आणि कसेंसेंच वाटावयाला लावते. एक दोन उदाहरणें देतों. बुखारीवरील लेखांतले हें वाक्य पहा, 'लिफ्ट बंद असल्यामुळें आम्हांला जिना तुडवीत वर जावें लागलें.' मनुष्य चिखल तुडवीत, माती तुडवीत किंवा जमीन तुडवीत जातो. सपाट प्रदेशावरून पुढें जाण्याच्या क्रियेंत कांहीं तुडवल्याचा भास होतो. जिना चढण्याच्या क्रियेला 'तुडवणें' हा शब्दप्रयोग कसासाच वाटतो. 'गांधी-' वरील लेखात एके ठिकाणी ते म्हणतात; "......त्या कपाटांतून स्वागतपूर्ण दृष्टिक्षेप करणाऱ्या पुस्तकांकडे एक बेफिकीर कटाक्ष टाकून म्हणाले...." कपाटांतलीं पुस्तकें स्वागतपूर्ण दृष्टिक्षेप कसा काय करतात? उलट, पुस्तकाच्या कपाटाकडे पहाणाराला ती पाठमोरी होऊन बसली आहेत असाच भास होतो. खोट्या काव्यमयतेचा मोह टाळून 'कपाटांतल्या पुस्तकांकडे एक बेफिकीर कटाक्ष टाकून गांधी म्हणाले,' असें पाध्यांनीं म्हटलें असतें तर वाचकाला अधिक बरें वाटलें असतें. विभावरीचें वर्णन करतांना, "......ती हंसली म्हणजे......तिच्या कपाळावर लहरींचें विणकाम होई......" असें पाध्ये लिहितात. कपाळावर आठ्यांचें जाळें पसरतें, किंवा घामाचे बिंदू उभे रहातात. लहरी म्हणजे तरंग, लाटा. कपाळावर कसले तरंग येतात? आणि लहरी एकामागून एक येतात; त्यांचें विणकाम कसें काय होतें? कांहीं तरी अलंकारिक लिहिलें म्हणजेच भाषाशैली चांगली ठरते, या भ्रामक कल्पनेनें अशीं वाक्यें पाध्यांच्या हातून लिहिलीं गेलीं आहेत. हे दोष अगदीं क्षुल्लक आहेत आणि ते काढून टाकणें पाध्ये यांना मुळींच कठीण नाहीं. 'प्रकाशांतील व्यक्ति' हें पुस्तक आपल्या अनेक वैशिष्ट्यांमुळें कुणालाहि खात्रीनें वाचनीय वाटेल.